






# नादब्रह्माचे मानकरी

विठ्ठलराय भट



Shrikrishna Dhore

❖ प्रथम आवृत्ती ❖

५ मे, २०१२

❖ छपाई ❖

अनमोल मुद्रणालय, पुणे

❖ टाईपसेटिंग ❖

देविका जगताप

❖ कव्हर ❖

श्रीकृष्ण ढोरे

❖ प्रकाशन ❖

मुक्तांगण प्रकाशन

८८०, शुक्रवार पेठ,

पंचमुखी मारुती मंदिरासमोर, पुणे - २

मोबाईल नं. ९३७०१६८८९०

❖ किंमत ❖

६०/-

*प्रिय मित्र*

*श्री. मनोहर कोरगांवकर*

*यांस सप्रेम*

*Music is the universal language of mankind*

*- Outre-Mer Long fellow*

**संगीत ही सर्व मानवांना समजणारी भाषा आहे**

– ऑट्रेमेर लाँगफॅलो

# मनोगत

संगीत ही निसर्गाने मानवाला दिलेली मोठी देणगी. आदिमानव पक्ष्यांचे कूजन, कोकिळेचे कुहुकुहु, पानांची सळसळ, रानवाऱ्यातून येणारी मधुर शीळ इत्यादी ऐकून भारावून जायचा. मग तो स्वत: शीळ घालायला शिकला. बांबूच्या मुरलीतून मधुर स्वर काढायला लागला व नादब्रह्मात रंगून जाऊ लागला.

आमचे चार वेद; रामायण-महाभारत ही महाकाव्ये, पुराणे, स्मृती, उपनिषदे, गणितशास्त्र (भास्कराचार्य), खगोलशास्त्र (आर्यभट्ट) व्याकरण (पाणिनी), खगोलशास्त्र, आयुर्वेद (चरक, सुश्रुत), इ. सर्व प्राचीन संस्कृत वाङ्मय छंदोबद्ध, काव्यस्वरुपात व कर्णमधुर असे आहे. लोकगीते व लोकसंगीत ही तर जगभरातील आदिमानवाने जगाला दिलेल्या अमूल्य अशा देणग्या आहेत.

कंठसंगीत व वाद्यसंगीत यात नाम कमावलेल्या काही मान्यवरांचे रोचक परिचय या पुस्तकात करून दिलेला आहे. भारतीय शास्त्रीय संगीताला त्यांनी जगभर मान्यता मिळवून दिली आहे. वाचकांना हा प्रयत्न आवडेल अशी अपेक्षा आहे.

- विठ्ठलराय भट

आंबटकर कंपौंड,

आंबिवली (पश्चिम) पो. मोहोने

जि. ठाणे - ४२११०२

मो. ९२२१३०९७५८,

# मुक्तांगण प्रकाशन सूची

| क्र. | पुस्तकांचे नाव | लेखक | किंमत |
|---|---|---|---|
| १. | जसे पहावे तसे | मनोहर कोरगावकर | १५०/- |
| २. | शिक्षण वाटा वळणे | मनोहर कोरगांवकर | १५०/- |
| ३. | पलिकडचे मन | मनोहर कोरगांवकर | १००/- |
| ४. | जांभवली ते अंबिवली | विठ्ठलराय भट | ९०/- |
| ५. | नोकरनामा | विठ्ठलराय भट | ९०/- |
| ६. | सोनफुले | विठ्ठलराय भट | ७०/- |
| ७. | मोरनाचारा हवा | विठ्ठलराय भट | ७५/- |
| ८. | अंकल सॅमच्या देशात | प्रदीप तळावलिकर | १५०/- |
| ९. | सुविचारातून मन:शांतीकडे | ले. रा. रा. जांभेकर | २५/- |
| १०. | जीवन हाच गुरू | ले. रा. रा. जांभेकर | ३०/-. |
| ११. | दूरदेशीच नामवंत | विठ्ठलराय भट | २५/- |
| १२. | प्राचीन नालंदा व तक्षक्षिला | विठ्ठलराय भट | १५/- |
| १३. | गोडगोड भक्तीगीते | कुसुमबांधव | २०/- |
| १४. | माझी आत्मकथा | डॉ. बाबासाहेब आंबेडकर | १५०/- |
| १५. | गाजलेली भाषणे | डॉ. बाबासाहेब आंबेडकर | १००/- |
| १६. | धर्मांतर का? | डॉ. बाबासाहेब आंबेडकर | ४०/- |
| १७. | रामकृष्ण कोडे | डॉ. बाबासाहेब आंबेडकर | ३५/- |
| १८. | मुलांचे बाबासाहेब आंबेडकर | संकलन | २०/- |
| | | | ५०/- |
| १९. | गुलामगिरी | महात्मा ज्योतिबा फुले | ५०/- |
| २०. | शेतकऱ्याचा आसूड | महात्मा ज्योतिबा फुले | ९०/- |
| २१. | सावित्रीबाई फुले | संकलन | २५/- |

| क्र. | पुस्तकांचे नाव | लेखक | किंमत |
| --- | --- | --- | --- |
| २२. | लैंगिक समस्या व होमिओपॅथी | डॉ. सुपारे एल.एल. | ३०/- |
| २३. | समस्या महिलांच्या व होमिओपॅथी | डॉ. सुपारे एल.एल. | २०/- |
| २४. | नित्याचे आजार व उपचार | डॉ. सुपारे एल.एल. | ३०/- |
| २५. | स्त्रियांनों सौंदर्य सांभाळा | डॉ. सुपारे एल.एल. | २५/- |
| २६. | सुविचार माला | मनिषा बर्वे | १५/- |
| २७. | उद्गार मनाचे | मनिषा बर्वे | २०/- |
| २८. | मन | पिंगळे वि.दा. | २०/- |
| २९. | चकवा | विठ्ठलराय भट | १०/- |
| ३०. | बुद्धवंदना | | १०/- |
| ३१. | जीवन विकासाचा ज्ञानदीप | डॉ. ज्ञानेश्वर तांदळे | २०/- |
| ३२. | देशभक्तीपर गीते | प्रमिला मोडक | २०/- |
| ३३. | थोरांचे विचार | प्रमिला मोडक | २०/- |
| ३४. | बुद्ध पूजापाठ व विवाहपद्धती | | ४०/- |

## आगामी प्रकाशने

❖ इसापनिती ❖, ❖ पंचतंत्र ❖, ❖ बिरबल बादशहा ❖, ❖ हितोपदेश ❖,
❖ नागपूरची धम्मक्रांती ❖,❖ महामाता रमाबाई ❖,
❖ सिद्धार्थ गौतमबुद्ध चरित्र ❖, ❖ मायक्रोव्हनचे स्वादिष्ट पदार्थ ❖,
❖ बडबडगीते ❖, ❖ अस्पृश्य मूळचे कोण व कसे बनले ❖

# अनुक्रमाणिका

# स्वरसम्राट – भीमसेन जोशी

स्वरसम्राट भीमसेन जोशी म्हणजे जणू काही स्वरभास्करच! त्यांचा जन्म रथसप्तमीच्या दिवशी (२ फेब्रुवारी १९२२) झाला. सात घोड्यांच्या रथावर आरुढ होणाऱ्या भास्कराने गुरुराज व गोदावरीबाई यांच्या पोटी जणु सात स्वरांचे बालकच वरदान म्हणून जन्माला घातले. त्याने लहानपणापासूनच सप्तसुरांची आराधना केली ती जवळजवळ अखेरच्या घटकेपर्यंत.

**परंपरा**

कर्नाटकातील धारवाड जिल्ह्यातील गदग हे त्यांचे जन्मगाव. घराणे सनातनी वृत्तीचे. विद्या व्यासंगी वडील गुरुराज हे संस्कृत पंडित. त्यांनी तयार केलेला कानडी इंग्रजी शब्दकोष प्रमाण कोष म्हणून आजही मानला गेला जातो. कर्नाटकातील एक संत शिरोमणी राघवेंद्रस्वामी यांच्या शिकवणीचा इंग्रजीतून विवेचन करणारा गुरूराजांचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. भीमसेनचे आजोबा भीमाचार्य हे सुप्रसिद्ध असे कीर्तनकार होते. ते मधुर आवाजाचे गायक होते. आजोबांचे नाव नातवाला देण्याची पद्धत आहे. त्यामुळे नवजात बालकाचे भीमसेन असे नाव ठेवण्यात आले. आजोबा तंबोरा छान वाजवीत रसाळपणे पुराण सांगत असत. त्या काळातील बहुतेक पुराणिक मंडळी संगीतसाधना करीत असत.

गुरूराजना आपल्या मुलाने खूप शिकावे असे वाटत होते. त्यामुळे त्यांनी आजोबाचा तंबोरा नातवाच्या नजरेला पडू नये म्हणून खूप काळजी घेतली होती. पण विधिलिखित वेगळेच होते. तंबोरा नातवाला खुणावत होता व नादावू लागला.

शाळेतून घरी परतण्याच्या मार्गावर ग्रामोफोन तबकड्यांचे एक दुकान होते. भीमसेन दुकानाच्या आसपास घोटाळत उभा राहायचा. दुकानदार आपल्या गिऱ्हाईकांसाठी नारायणराव व्यास, पंडितराव नगकर इ. त्या काळातील लोकप्रिय गायकांच्या ध्वनिमुद्रिका ग्रामोफोनवर वाजवीत असे. त्यातून उमटणारे सूर आपल्या कानांत साठवीत भीमसेन तिथे तासन्तास घुटमळत उभा राही, स्थळकाळाचे भान विसरून जाई, त्यामुळे अर्थातच घरी यायला उशीर होई. शाळा सुटल्यावर मुलगा अभ्यासासाठी थांबत असावा असे समजून घरची माणसे त्याला काही विचारीत नसत.

एक दिवस दुकानाबाहेर गाणे ऐकत उभा असताना विलक्षण भावमधुर प्रत्ययकारी सूर भीमसेनाच्या कानी आला. तो सूर थेट त्यांच्या काळाजात व अंतर्मनात रूतून गेला. तो सूर होता किराणा घराण्याचे श्रेष्ठ गायक-उस्ताद अब्दुल करीम खान यांचा. खानसाहेबांच्या कंठातून 'फगवा ब्रिज देखनेको चलो री' ही बसंत रागातील रचना व झिंझोटी रागातील 'पिया बिन नही आवत चैन' ही ठुमरी ऐकता ऐकता झपाटल्यागत झाले. मग त्या दोन बंदिशी वारंवार ऐकण्याचा छंदच भीमसेनाना जडला. तसे गाणे गाणारा गायक आपण व्हावे असे त्यांनी ठरवून टाकले.

त्याच सुमारास वडिलांबरोबर त्यांना कुंदगोळला जाण्याचा योग आला. तिथे एका मैफलीत रामभाऊ कुंदगोळकरांचे (सवाई गंधर्व) गाणे ऐकायला मिळाले. सवाई गंधर्व हे अब्दुल करीम खांचे पट्टशिष्य. भीमसेनच्या अंतमर्नात रुजलेले खानसाहेबांचे सूर, प्रतिध्वनित झाले व देहवीणा झंकारली. सवाई गंधर्वांसारखा गुरू आपणांस लाभेल का असा विचार त्यांच्या मनात तरळला. पण तो योग काही तेव्हा जमून आला नाही.

**बालपण**

अगदी लहानपणापासून भीमसेनांना स्वरांची ओढ होती. शेजारच्या मशिदीतून बांग ऐकू आली तरी हा तिथे धावत जाणार. दारावरून रात्री सनई बँडच्या गंगाजमनी मिरवणूक निघाली की हा त्या सुरांचा पाठलाग करत रस्त्यावरून धावणार. झोप अनावर झाली तर रस्त्यातच झोपणार. अशा हरवलेल्या भीमसेनाला रात्री-अपरात्री अनेकवेळा उचलून घरी आणावे लागे. वैतागलेल्या वडिलांनी मग त्यांच्या पैरणीच्या (शर्टवर) पाठीवर त्याचे नाव पत्ता लिहून ठेवले!

वयाच्या सातव्या वर्षीच भीमसेनने 'अमरकोश' तोंडपाठ केला. मुंज पार पडल्यावर पंडित प्रद्युम्नाचार्य वरखेडकर यांच्याकडे संस्कृत शिकण्यास त्यांनी प्रारंभ केला. पण तिथे ते रमत नव्हते. समजदार शास्त्रीबुवानींच मग सांगितले, ''तू संस्कृतपंडित होणार नाहीस. गान पंडित होऊ शकशील. गाणंच शीक'' पडत्या फळाची आज्ञा घेऊन भीमसेन सटकले.

दर गुरुवारी घरी भजन असे. त्यात भीमसेन भजने म्हणू लागले. ते ऐकताना वडील भान हरपून गेले. मुलाचा कल वडिलांच्या ध्यानी आला. गरिबीचा संसार असूनही त्यांनी आपल्या मुलाला दरमहा पाच रुपये फी भरून इनायत खांचे शिष्य-अगसरू चिन्नप्पा कुर्तकोटी यांची गाण्याची शिकवणी ठेवली. 'भीमपलास' रागाने त्यांची शिकवणी सुरू झाली. सात महिने पद्धतशीरपणे शिकवणी चालली होती. वडील खूष होते. पण भीमसेन मात्र नाखुश होते. त्यांना ती शिकवणी मनाला भावली नाही.

एका बाजूने संगीत साधना चालू असतानाच आपल्या शारीरिक तंदुरुस्तीकडे भीमसेनांचे लक्ष असे. ते पोहण्यात तरबेज झाले होते. मनमुरादपणे फुटबॉल खेळत असत व योगसाधनापण करीत. सकाळ-संध्याकाळ मिळून वीस मैल पायी फिरत असत. त्यामुळे त्यांची तब्येत ठणठणीत झाली. त्याचा फायदा त्यांना पुढे सकाळपासून रात्री उशीरापर्यंत रियाझ करताना झाला.

**पलायन**

मनासारखा गुरू भेटल्याशिवाय संगीत साधना जमणार नाही याची खूणगाठ

बांधून वयाच्या ११व्या वर्षी त्यांनी घरातून पळ काढला व गुरूच्या शोधात निघाले (१९३३). खिशात पैसा नाही, काही इंग्रजी शब्द व गायला येत असलेली दोन-चार गाणी अशी शिदोरी घेऊन त्यांनी भुसावळपर्यंत विनातिकिट प्रवास केला. तिथे तिकिटचेकरने पकडले. ''तुम जागो मोहन प्यारे'' हे गाणे चेकरला ऐकवून आपली सुटका करून घेतली व पुण्याला पोचले. पुण्याच्या स्टेशनवर परत पकडले गेले तेव्हा चेकरला ''कोन कोन कोन गुन गाने' हे गाणे म्हणून दाखवून सुटकेची याचना केली. पण हा तिकिट चेकर संगीताच्या बाबतीत औरंगजेब होता. त्याने गुणगुणणाऱ्या पोराला दोन दिवस नजरकैदेत ठेवले व मगच सुटका केली.

**वणवण**

पुण्याला पोचल्यावर भीमसेन मास्टर कृष्णरावांच्याकडे गेले व त्यांना गाणं शिकविण्याची विनंती केली. ''महिना शंभर रुपये फी द्यावी लागेल'' हे कृष्णरावांचे शब्द ऐकून त्यांचा स्वप्नभंग झाला. ते पुण्याहून निसटले व ग्वाल्हेरला पोहोचले. ग्वाल्हेर त्याकाळी गाण्याची पंढरी होती. तिथे संस्थानातर्फे संगीत शिकणाऱ्यांना दुपारचे भोजन मिळते असे समजले पण त्यासाठी कुणातरी मातब्बराची शिफारस लागे.

आजचे सरोदवादक अमजाद अली यांचे वडील हफीज अली यांच्याकडे भीमसेन पोचले. रेल्वे प्रवासात मोडके तोडके हिंदी शब्द कानांवरून गेले होते. हफीज अलींना आपली अडचण सांगितली. त्यांनी शिफारसपत्र दिले. दुपारच्या जेवणाचा भीमसेनांचा प्रश्न मिटला. रात्रीला ते जेवण घेत नसत. कारण हातात पैसाच नव्हता.

ग्वाल्हेरला एका कीर्तनकार बुवांच्यामागे उभे राहून तंबोरा वाजविण्याचे काम पत्करले. त्यामुळे त्यांच्या घरी राहण्याची सोय झाली पण फक्त राहण्याचीच; जेवणखाणाची नाही. बुवांच्यामुळे दरबारातील उत्सव बघायला मिळाला. बुवांच्या बरोबरचा तंबोरवाला म्हणून नारळ व दहा रुपये बिदागी मिळाली. नारळ बुवांच्या पत्नीला दिला व दहा रुपयांचे नवे कपडे घेतले.

रोज सायंकाळी गाणं शिकायला भीमसेन 'माधव संगीत विद्यालया'त जावू

लागले. आठवड्यातील तीन वार कृष्णराव पंडित तर बाकीचे दिवस पंडित राजभट पूंछवाले गाणं शिकवीत. ३०-४० मुलं एकावेळी क्लास स्वरूपात गाणं शिकत. अशाने संगीत शिक्षण कसे होणार? तरीपण कसे तरी सांशिकपणे सहा महिने मन लावून संगीत शिकण्याचा प्रयत्न केला. शेवटी राजभैय्याना भेटून आपल्या मनातील व्यथा सांगितली. ''तुला चिठ्ठी देतो. तू खडकपूरला जा. तिथे केशवराव लुखे म्हणून चांगले संगीत शिक्षक आहेत. त्यांना मूलबाळ नाही. तुला ते गाणे शिकवतील.'' राजभैय्याचे शिफारसपत्र घेऊन भीमसेन लुख्यांच्या घरी पोचले. तिथे चार महिने राहिले. लुखे गावभर फिरून संगीताची शिकवणी करीत व भीमसेन घरी बसून असत. लुख्यांनीच मग त्यांची कलकत्ता येथे रवानगी केली. तिथे 'मॅगेफोन रेकोर्डिंग कंपनी'त विश्वदेव चक्रवर्ती म्हणून मोठे गवई होते. बादलखाँ यांचे ते शिष्य. तिथे गेल्यावर त्यांची पहिली गाठ पडली पहाडी सन्याल यांच्याशी. त्यांना एक गाणं म्हणून दाखविल्यावर सन्याल म्हणाले, ''ठीक आहे. राहा इथं. मी तुझ्यासाठी चक्रवर्तीकडे शब्द टाकतो.'' पण भीमसेनकडे ना कपडा ना पैसा. खाण्यापिण्याचे काय? त्यांची अडचण बघून चक्रवर्तींनी त्यांना आपल्या घरी हरकाम्या म्हणून ठेवून घेतले. लांबच्या विहिरीवरून पाणी आणणे, कपडे धुणे, व किरकोळ कामे करणे असे करत सहा महिने तिथे काढले. चक्रवर्तींनी त्यांना गांधारी रागातली चीज शिकविली. पण तालीम काही सातत्यानं मिळाली नाहीच. सन्याल व चक्रवर्ती सदोदित सिनेमाच्या शूटिंगच्या गडबडीत असत किंवा लोकांच्या गराड्यात असत. भीमसेननी शिक्षणाचं विचारलं तर, ''चित्रपटात काम करता करता शिक'' असे सांगण्यात आले. ''मला चित्रपटात काम करायचं नाही तर गवई व्हायचं आहे.'' भीमसेनांचा निर्धार ऐकून सन्यालनी त्यांना पन्नास रुपये दिले व वाटेल तिकडे जाण्याची परवानगी दिली.

कलकत्त्याहून भीमसेन दिल्लीला पोचले. तिथे चांदखाँ वगैरे घराणेदार मंडळी होती. पण कुणीही त्यांना तिथे थारा दिला नाही. ''तू जालंदरला जा. तिथे तुला गाणं शिकवणारे भेटतील.'' असा कुणीतरी फुकटचा सल्ला दिला. तो प्रमाण मानून भीमसेन जालंदरला डेरेदाखल झाले. तिथे मंगतराम नावाचे अंध, धृपद गायक होते. ते ''आर्य संगीत विद्यालय'' चालवीत असत. तिथे मास्टर मदन

म्हणून एक गवई होते. ''कृष्णा ऑईल मिल्स''च्या मालकाने दरमहा चार रुपयांची शिष्यवृत्ती (गाणं शिकण्यासाठी) भीमसेनना दिली. दरमहा तीन रुपयांत खाणावळीतून जेवण मिळे. एक रुपया हात खर्चाला उरे. दोन वर्षे जालंदरला राहून भीमसेन धृपद शिकले. मंगतरामना ख्यालातलं काही येत नव्हतं. पण जालंदरला ख्याल खूप ऐकायला मात्र मिळाले.

### स्वगृही परत

दरवर्षी जालंदरला ''हरिवल्लभ का मेला'' नावाचा संगीत जलसा भरत असे. तिथे महाराष्ट्रातून पंडित विनायकबुवा पटवर्धन, पंडित वामनराव सडोलीकर, कृष्णराव चोणकर ही नामवंत मंडळी हजेरी लावत असत. १९३४ सालात भरलेल्या मेळ्यात विनायकबुवा पटवर्धन आले होते. भीमसेनने त्यांना भेटून आपली अडचण सांगितली. विनायकबुवा म्हणाले, ''अरे! सवाई गंधर्वासारखा समर्थ गुरू, कुंदगोळला, तुझ्या गावाजवळच तर आहे. तिथे जायचे सोडून तू गावोगावी का भटकत आहेस?'' त्यांचा सल्ला मानून भीमसेन गावी परतले. वडिलांच्या मित्राच्या मदतीने त्यांनी सवाई गंधर्वांची भेट घेतली. त्यांनी शिष्य म्हणून भीमसेनचा स्वीकार केला. एक दीर्घ शोधयात्रा संपली. आता किराणा घराण्याच्या गायकीचा शोध सुरू झाला.

### पारंपारिक पद्धतीने तालीम

गुरूगृही राहून, त्यांची सेवा करून, मर्जी राखून पारंपरिक पद्धतीने भीमसेननी सवाई गंधर्वांकडे तालीम घेतली. दिवसाचे बारा तास गुरूंच्या करड्या नजरेखाली सख्त रियाझ केला. तोडी, मुलतानी, पूरिया या रागांची भरपूर तालीम सवाई गंधर्वांनी त्यांना दिली. सप्तस्वरांचे सारे श्रृतिभेद आपल्या शिष्याच्या गळ्यात पक्के रुजवले. या रागांचा एक एक पलटा तासन्‌तास ते घोटवून घेत. त्यामुळे गळा कोणताही राग गायला तयार झाला. मैफिलीच्यावेळी अनेकदा सवाई गंधर्व या शिष्याला आपल्याबरोबर नेत असत. त्यातूनच मैफल जमविण्याचे तंत्र शिकले.

### सुवर्णसंधी

आकाशवाणीवरून, छोट्या-मोठ्या मैफलीतून भीमसेन गाऊ लागले. पण

१९४६ साली त्यांना भविष्यकाळातील सोनेरी दिवसांची चाहूल लागली ती पुण्याच्या हिराबागेत सवाई गंधर्वांची संगीत सभा साजरी झाली तेव्हा. आपल्या गुरूच्या साक्षीने भीमसेनांनी त्या मैफलीत ऐकविलेला ''मिया मल्हार'' इतका विलक्षण जमला की, गुरूने भरसभेत आपल्या शिष्याची पाठ थोपटली. त्यानंतर गावोगावची अनेक आमंत्रणे त्यांना मैफलीसाठी यायला लागली. नंतर त्यांनी कधी मागे वळून पाहिले नाही. ते पंडित भीमसेन जोशी झाले.

**किराणा गायकी**

गेली पंचावन्न वर्षे पंडितजी सतत गात आहेत. भारतात, परदेशात मिळून हजारो मैफिली त्यांनी गाजवल्या. जगातील लक्षावधी रसिकांना त्यांनी किराणा गाण्याचा स्वरमधूर गायकीचा आनंद भरभरून दिला आहे. स्वरप्राधान्य हे किराणा गायकीचे वैशिष्ट्य आहे. रागातील प्रत्येक स्वर विविध अंगांनी खुलविण्यावर भर असतो. साहजिकच ज्या रागात भरपूर सूर उपलब्ध असतात ते राग गाण्याकडे किराणा गायकांचा कल असतो. त्यामुळे – तोडी, आसावरी, वृंदावनी सारंग, मुलतानी, पूरिया, धनश्री, शुद्ध कल्याण, यमन कल्याण, दरबारी कानडा, मिया मल्हार असेच राग भीमसेनांच्या मैफलीत ऐकायला मिळतात. या रागातील ठराविक बंदिशीच ते ऐकवतात. ''बंदिशी जमा करण्याचा मला सोस नाही. हा सोस वाढला तर केवळ बंदिशींची संख्या वाढते पण गायकी मागे पडण्याची भीती असते.'' असे त्यांचे स्पष्ट मत आहे.

किराणा गायकांत सहसा न आढळणारी तानक्रिया पंडितजींनी स्वकष्टाने साध्य केलेली आहे. त्यांच्या गायकीत त्यामुळे सौंदर्याचे एक वेगळे परिमाण लाभले आहे. मैफिलीत एखादा अभंग पंडितजीकडून ऐकताना त्यावर नारायणराव बालगंधर्वांची छाप कधी कधी दिसते.

**कृतज्ञता सोहळा**

पंडित भीमसेन यांच्या पुढाकाराने पुण्यात दरवर्षी सवाई गंधर्वांच्या नावे संगीत सोहळा साजरा होतो. ह्या सोहळ्यात कार्यक्रम सादर करणे कलाकारांना भूषणावह वाटते. हजारो श्रोते वर्षानुवर्षे या कार्यक्रमाचा मन भरून आनंद लुटतात. ह्या

सोहळ्याच्या निमित्ताने पंडितजी आपल्या गुरूबद्दलची कृतज्ञता व्यक्त करतात. त्या सोहळ्यात एखाद्या सेवकाच्या भावनेने वावरत असतात. आपल्या गुरूच्या कृपाशीर्वादाने आपण यशाच्या जागतिक कीर्तीच्या शिखरावर पोचल्याची त्यांना जाण आहे.

### गायकीची खासीयत

गानरसिकाला स्वरांचा मोह सर्वप्रथम होतो. ताल समजला नाही, शब्द कळले नाही तरी चालते. रसिक व पंडितजी या दोघांमधील महत्त्वाचा दुवा म्हणजे 'स्वर'. ख्यालाची सुरेल भक्तिभावपूर्वक आलापी हा मांडणीचा मानबिंदू. राग विस्तार करीत असताना क्रमश: एकेका स्वरांचे सौंदर्य उलगडून दाखवीत ते पुढे जातात.

पंडितजींच्या गाण्यात दमदार कणखरपणा असला तरी त्यात एक लाडिक लाघवीपणा असतो. ''म्हणूनी ठेविल्ली पायी डोई'' - या शब्दांत पंडितजी 'ल'कार दुहेरी घेतात. दुसऱ्या कोणी तुकोबाच्या अभंगाची अशी लगट केली असती तर दाही दिशांतून निषेधाचे सूर उमटले असते.

पंडितजींची मैफल जमायला वेळ लागत नाही. तशी ती कंटाळवाणी पण होत नाही. बैठकीवर बसले, सूर लावला की, मैफलीची रंगत हात जोडून पुढे उभी असते. एखादे गाणे किंवा चीज संपल्यावर मध्ये थांबून घाम पुसण्याच्या निमित्ताने ते वेळ घालवत नाहीत किंवा साथीदारांशी उगीचच काहीबाही बोलत बसत नाहीत. अर्धे मिनिटसुद्धा न थांबता पंडितजी लगेच पुढील गाण्याला सुरुवात करतात.

### देखणे गाणे

पंडितजींचे गाणे ऐकण्यासारखे तर असतेच पण ते पाहण्यासारखे सुद्धा असते. एका जाणकार रसिकाने त्याचे मार्मिकपणे वर्णन केलेले आहे - ''भीमसेनजी गातात तेव्हा काय करीत नाहीत? कधी आकाशाकडे बघतात, तर क्षणात पाताळ धुंडू लागतात. कधी तलवार तर कधी रहाट चालवतात. कधी हळुवारपणे फुले वेचतात तर कधी विखुरलेले मोती एकेक करून गुंफतात. कधी दळतात तर कधी धमकावतात.'' आहे की नाही मजा?

## किराणा घराणे

पंडित भीमसेन यांचे गाणे समजावून घ्यायचं असेल तर किराणा गायकीची परंपरा आणि तिची वैशिष्ट्ये समजून घेणं जरूरीचे आहे. भीमसेन हे रूढार्थाने किराणा घराण्याची परंपरा जोपासणारे आहेत. पण त्यांचं गाणं फक्त त्याच परंपरेत अडकून पडलेलं नाही. ते कितीतरी बदललेलं आहे. विकसित झालेलं आहे, प्रगल्भ झालेलं आहे. किराणा गायकी प्रमाणेच ख्याल गायकीला त्यांनी एक वेगळेच परिमाण प्राप्त करून दिलेले आहे.

किराणा गायकी स्वरप्रधान असली तरी, आवाज लावण्याची या घराण्याची पद्धत अन्य घराण्यापेक्षा काहीशी वेगळी आहे. ती गळ्याला ताण देणारी व थोडीशी कृत्रिम अशी आहे. पण पंडितजींच्या आलापीत भाव उत्कंठतेने प्रकट होतात. एका स्वरातून दुसरा स्वर निर्माण करणे हे विशेष मानले जाते. भीमसेनांचा आवाज स्वच्छ, मोकळा, भरीव, व घुमारेदार आहे. एकेक स्वर वाढवून रागाचा विस्तार करण्याची पद्धत किराणा घराण्यात आहे. गंधारापर्यंत या पद्धतीने स्वरविस्तार करून एक भारदस्त परिणाम साधला जातो. वेगवेगळ्या स्वराकृतीतून रागाची प्रतिमा उभी राहते, व त्याची छाया साऱ्या मैफलीवर पसरते.

## ख्यालगायकीचा राजा

भीमसेनांनी ख्याल गायकी खऱ्या अर्थाने सर्व सामान्यांपर्यंत नेली. रागाचं शास्त्र समजलं नाही, बंदिश माहिती नाही, तरी गाणं रसिकाला भावतं, भुलवतं. टप्पा सोडला तर भीमसेन ख्यालाबरोबर सर्वच प्रकार गातात. ख्यालाचं पावित्र्य त्यांनी सांभाळलंय आणि त्याचा भारदस्तपणा जपला आहे. ख्यालाची त्यांनी कधी ठुमरी केली नाही. तसंच ठुमरीचा ख्याल होऊ दिला नाही. ठुमरी गायनातील अभिजातता व सौंदर्य त्यांच्या गाण्यात आहे. प्रारंभीच्या काळी त्यांनी बुजुर्गांचं गाणं खूप ऐकलं आहे. बडे गुलामअली, सिद्धेश्वरदेवी, व बेगम अख्तर यांचाही त्यात समावेश होता. ठुमरीचा संस्कार त्यांच्यावर त्यांच्यावरून झाला आहे असे वाटते. शृंगार रसाबरोबरच - विरह व व्याकुळतीचं दर्शन भीमसेन कमालीच्या उत्कंठतेनं घडवतात. मिश्र काफीतली ''पिया तो मानत नाही'' किंवा जोगियांतील

''पिया मिलन की आस'' ऐकताना भीमसेनांचं ठुमरीवरचं प्रभुत्वही दिसतं.

शुद्ध कल्याण, यमन, किंवा मारु बिहाग, मालकंससारख्या रागानं सुरू होणारी भीमसेनांची मैफल चढत्या रंगतीनं भैरवीकडे वाटचाल करते. मध्यंतरानंतर येणारा दरबारी, मियाँमल्हार, किंवा अभोगी-कोणताही राग असो, तो पूर्वार्धाइतकाच रंगणार यात संशय नाही! मग एखादी ठुमरी, नाट्यगीत किंवा भजन. त्यांचा ख्याल जसा मनात भरणारा, तशीच त्यांची भैरवी कानांत रुंजी घालत असे. ''जो भजे हरिको सदा'' असो किंवा ''बाबुल मोरा'' असो किंवा ''अगा वैकुंठीच्या राजा'' असो, स्वरांची तीच आर्तता कायम राहते.

**संतवाणी कार्यक्रम**

रागदारीच्या मैफली एवढीच 'संतवाणी'ची मैफल पण अवीट गोडीची असते. आठ-दहा हजारांचा जनसमुदाय खिळवून ठेवणारे सामर्थ्य त्यांच्या भजनांत आहे. ख्यालाएवढी तल्लीनता त्यांच्या भजनात आहे. खरं म्हणजे भजनगायकी त्यांचा स्थायीभाव नव्हता. पुरंदरदास, जगन्नाथदासांची कन्नड भजने, ब्रह्मानंदांची हिंदी भजने आणि रामभाऊंकडून घेतलेले मराठी अभंग ते पूर्वी गात होते.

''श्रीनिकेतना पालयमा'', ''कायो करुणानिधे''; ''भाग्यदा लक्ष्मी बारम्मा'' यासारखी कन्नड भजने त्यांच्यामुळे मराठी भाषिकांनापण माहित झाली आहेत. आकाशवाणीवरून प्रसारित होणाऱ्या ध्वनिमुद्रिकांतून ती भजने लोकप्रिय झाली आहेत. ख्याल व ठुमरीबरोबरच भजन गाण्याची परंपरा किराणा घराण्यात आहे. हिंदुस्तानी संगीताच्या क्षेत्रात पंडित विष्णु दिगंबर पलुस्करांच्यापासून आजवर अनेकांनी बैठकीतून भजनं गाण्याचा प्रयत्न रूढ केला आहे. अर्थात प्रत्येकानं आपपल्या व्यक्तिमत्त्वाप्रमाणे त्यात रंग भरलेले आहेत.

''संतवाणी''चा कार्यक्रम म्हणजे ''भागवत धर्माचं स्वरचित्र'' म्हणायला हवं. १९६८ ते १९७२ या काळात भीमसेन पुणे आकाशवाणीवरून अभंग गात होते. ''अधिक देखणे तरी, निरंजन पाहणे'' - पुणे केंद्रावरून प्रसारित झालं आणि हळूहळू एकेक अभंग स्वरसाज घेऊन सादर होऊ लागला. ज्ञानदेव, एकनाथ, तुकाराम, यासारख्या संतांच्या रचना भीमसेनांच्या अवीट स्वरामुळे श्रोत्यांच्या

ओठी गेल्या. त्यातूनच मग १९७२ साली 'संतवाणी'चा कार्यक्रम आकाराला आला. ''नामा म्हणे मज विठ्ठल सापडला'' ''अणुरणिया थोकडा'' सारखी भजने सर्वनोमुखी झाली.

**मानसन्मान**

पंडित भीमसेन जोशी यांच्या अमृतमहोत्सव समितीच्या वतीने पुणे येथे भव्य समारंभ आयोजित करण्यात आला होता. श्रेष्ठ संगीत दिग्दर्शक नौशाद अली यांच्या हस्ते ''भीमसेन मुद्रा'' देऊन त्यांचा गौरव करण्यात आला. समारंभात मुख्य पाहुणे म्हणून पंतप्रधान अटलबिहारी वाजपेयी म्हणाले,''सदैव संगीतात रममाण झालेले पंडित भीमसेन गुरूराज जोशी हे कुणा व्यक्तीचे नाव नसून, आराधना व वंदना याचेच ते दुसरे नाव आहे. पुण्यात आजपर्यंत अनेक संगीत कार्यक्रम झाले पण आजची संध्याकाळ मात्र वेगळी आहे. जीवनात संगीताला महत्त्वाचे स्थान आहे. नादाला आपण ब्रह्म मानतो. नादाशिवाय सृष्टीची कल्पनाही करता येत नाही. चारही वेदांतील सामवेद संगीतासाठीच महत्त्वपूर्ण आहे. भक्तिसंगीताने देशाला संजीवनी देण्याचे कार्य पारतंत्र्याच्या काळातही केले आहे व समाजाचे मनोबल टिकवून धरले आहे. संगीताने भक्ती व करुणेचा असा प्रवाह तयार केला आहे की, ज्याच्यामुळे साऱ्या समाजाला नवजीवन प्राप्त झाले आहे. भीमसेनांच्या गाण्यात करुणा व भक्ती; माधुर्य व ऊर्जा यांचा सुरेख संगम आहे. त्यांचे भक्तीसंगीत मी जेव्हा ऐकतो तेव्हा माझे हृदय भरून येते. जुन्या स्मृती उजळून निघतात.''

पंडित भीमसेन जोशी यांना - 'संगीतरत्न' 'तानसेन पुरस्कार', 'लता मंगेशकर पुरस्कार' ''स्वरभास्कर'', 'वज्रदेही', 'पद्मभूषण', 'पुण्यभूषण', टिळक-महाराष्ट्र विद्यापीठाची डि.लिट्. पदवी असे अनेकानेक बहुमान प्राप्त झालेले आहेत. २००८ मध्ये त्यांना 'भारतरत्न' हा भारतातील सर्वोच्च नागरी किताब बहाल करण्यात आला.

**पार्श्वसंगीत**

पंडितजींनी काही चित्रपटांना पार्श्वसंगीत पण दिलेले आहे. पु.ल.देशपांडे

यांचा 'गुळाचा गणपती', 'बसंत बहार' व 'भैरवी' हे हिंदी चित्रपट व अमोल पालेकरांच्या 'अनकही' या चित्रपटांना त्यांनी पार्श्वसंगीत दिले आहे.

पंडितजींच्या यशाच्या मागे त्यांची पत्नी वत्सलाबाई याचा समर्थ असा सहभाग आहे. त्या स्वत: एक चांगल्या गायिका होत्या. पण त्यांनी आपले सर्वस्व व सर्व सामर्थ्य आपल्या पतीच्या पाठीमागे उभे करून आपले व्यक्तिमत्त्व त्यांच्यात मिसळून टाकले आहे.

पंडितजींना मोटारकारचे वेड आहे. एकेकाळी त्यांच्याकडे १५ मोटार गाड्या होत्या. भरधाव मोटार चालविणे हा त्यांचा छंद होता. वयोमानामुळे ड्रायव्हिंग करणे त्यांनी सोडून दिले. आपला वेळ ते चिंतन, रियाझ व शिष्यांना शिकवण्यात घालवीतात. सकाळ-संध्याकाळ कुत्र्याला घेवून आपल्या बंगल्याच्या आवारातच फिरणे त्यांचा विरंगुळा आनंद उपभोगत हा स्वरसम्राट आनंदाने जगत होता.

स्वरभास्कराचा अस्त झाला पण त्याची प्रभा मात्र जगभर झगमगत राहणार आहे.



# शहनाईचा शहेनशहा – बिस्मिल्ला खान

भारतातील सर्व आकाशवाणी केंद्रे सकाळच्या मंगलप्रभात कार्यक्रमात दिवसाची सुरुवात उस्ताद बिस्मिल्ला खान यांच्या मंजुळ सनईच्या वादनाने करतात. सारंग, ललत, अहिर भैरव, जौनपुरी, हंस नारायण, शुद्ध सारंग, वसंत बहार, मुलतानी, तिलक कामोद, मारु बिहाग, बागेश्री, मालकंस, भैरवी इत्यादी सर्व रागांच्या ठुमरी व धूनच्या त्यांच्या ध्वनिमुद्रिका व कॅसेटस भारतातील व जगातील बहुतांश भागात सतत वाजत असतात. लग्न समारंभाच्यावेळी 'वाजंत्र्यांच्या ताफ्यातील सहा छिद्रांचे एक वाद्य' अशी सनईची ओळख सर्वांना होती. पण तीच सनई बिस्मिल्ला खानसाहेबांच्या ओठांना लागल्यापासून तिचे हरेक सूर भावपूर्ण, सौंदर्यपूर्ण, रसाळ व माणसाच्या काळजाचा ठाव घेणारे ठरले आहेत.

बिस्मिल्ला खानची मैफल आहे असे समजताच रसिकांची झुंड ठरलेलीच असते. सतत तीन-चार तास विविध सुरांची मनोहारी संततधार त्यांच्या सनईतून बरसत असते. शुभ्रवेष धारण केलेली, डोक्यावर काळी गोल टोपी किंवा गांधी टोपी घातलेली सुहास्यवदन खानसाहेबांची मूर्ती रंगमंचावर दिसताच टाळ्यांचा प्रचंड कडकडाट होतो. त्यांची सतेज कांती व चेहऱ्यावरील तांबूसवर्ण नजरेत भरतो.

खानसाहेबांनी कधीही आपल्या रसिकांची निराशा केलेली नाही. ते बैठक

घालून आपल्या साथीदारांकडे एक ओझरती नजर टाकतात. आपल्या सनईतून पहिलाच 'सा' अशा काही ठरीव गोडव्याने काढतात की, जाणकार मंडळी खुशीने एकमेकांकडे बघून दाद देतात. सुरांचा लगाव, सुरांची आंस, घसट, लोंच, लफ्फा, मींड-सारं सारं काही रसिकांना भरभरून मुक्त हस्ताने ते देतात. त्यांच्या मैफलीत बसलेल्यांना आपल्या अंगावरून प्राजक्त फुलांचा जणू काही सडाच बरसत आहे असे वाटू लागते. लाडिक आलाप, डोंगराच्या उतरणीवरून खळखळ वहात येणाऱ्या झऱ्याची आठवण करून देणारी दिलबहार स्वरांची आवर्तने व शहनाईच्या स्वरविस्ताराचा उपयोग करून गायकी अंगाने घेतलेल्या जलद तानी ह्यांची खैरात करून ते श्रोत्यांची मने काबीज करतात. त्यांचे चिरंजीव मेहताब हुसेन व पुतणे मुमताज हुसेन हे तयार कौशल्याने खान साहेबांनी सोडलेल्या जागा अलगद भरून काढतात व रसिकांची वाहवा मिळवितात. बिस्मिल्ला खान यांचे नाव माहित नाही असा जगातील संगीत रसिक विरळाच!

**बालपण**

बिस्मिल्ला खान यांचा जन्म बिहार राज्यातील डुमराव ह्या गावी झाला. त्यांच्या जन्माची नक्की तारीख कुणालाच माहीत नाही. त्यांचे पूर्वज डुमराव संस्थानात आस्थान गवई व संगीतकार म्हणून नोकरीला होते. लहानपणापासूनच बिस्मिल्ला खान आपले मामा, बनारसचे प्रख्यात सनईवादक अलीबक्ष साहेब यांच्याकडेच वाढले. शहनाई वादनातील हेच त्यांचे परमगुरू. अलीबक्ष साहेब काशी विश्वेश्वराचे पिढीजात 'सनई सेवेकरी!' बिस्मिल्लांचे बालपण भक्तिरस व शहनाईच्या मधुर गुंजनाच्या वातावरणात गुजरले. त्यामुळे त्यांचा पिंड आध्यात्मिक व भावुक बनला. 'कलेसाठी कला नव्हे, तर ईशचिंतनासाठी कला' अशी त्यांची धारणा होती. ते जेव्हा कोणत्याही गावी मैफिलीसाठी आपला ताफा घेवून जाता तेव्हा ते सर्व प्रथम तेथील मशीद व मंदिरांना आवर्जून भेट देत. मैफल सुरू करायच्या अगोदर काही काळ एकांतात बसून जपमाळ घेवून ईशचिंतन करतात.

**तालीम**

काही काळ बिस्मिल्लांनी नथ्थन साहेबांचे सुपुत्र मोहम्मद हुसेन यांच्याकडे तालीम घेतली. तसेच त्यांचे थोरले बंधूही काही काळ बिस्मिल्लाचे गुरू होते.

लहानपणी बिस्मिल्लांचे अभ्यासाकडे लक्ष लागायचे नाही. शाळा बुडवून ते आपल्या सहकाऱ्यांबरोबर गोट्या खेळत असत किंवा मामूची सनई तोंडाला लावून ती वाजविण्याचा प्रयत्न करीत. त्यांची लगन बघूनच त्यांच्या मामांनी आपल्या भाच्याला पद्धतशीरपणे शास्त्रीय पद्धतीने रियाज करायला शिकविले. बालाजीच्या मंदिरात बसून ते सायंकाळी सात ते रात्री अकरा वाजेपर्यंत रियाज करीत. तसेच भल्या पहाटे सूर्योदयापूर्वी उठून, नमाज पढून सनईची पिपाणी जे तोंडाला लावीत ती सकाळी अकरा वाजेपर्यंत! अल्लाची प्रार्थना करीत असताना ते भक्तिभावाने काशी विश्वेश्वराची व सरस्वती देवीची भक्तीपण करत. ''खुदा के लिये जीना, और खुदाके लिया मरना'' असा त्यांचा आंतरिक भक्तिभाव होता.

### काशी विश्वेश्वराचे सेवेकरी

बिस्मिल्ला खान शियापंथी मुसलमान आहेत तरी त्यांचा पिंड मात्र सर्व धर्मसमभावाचा आहे. देशाला स्वातंत्र्य मिळाले त्यावेळी त्यांना पाकिस्तानला येऊन स्थायिक होण्यासाठी म्हणून मानाचे आमंत्रण दिले गेले होते. पण त्यांनी ते आमंत्रण नम्रपणे नाकारले. ''आपण काशी विश्वेश्वराचे सेवेकरी म्हणून त्याच्या पायाशी, भारतातच रहाण्याचे पसंत करू'' असे त्यांनी सांगितले. त्यावरून त्यावेळी कर्मठ मुसलमान पुढाऱ्यांनी त्यांच्याविरुद्ध काहूर उठविले होते.

### मैफिली

वयाच्या १४व्या वर्षी बिस्मिल्ला खान यांनी आपली पहिली सार्वजनिक मैफिल अलाहाबादला झालेल्या अखिल भारतीय संमेलनात रंगवली. त्यावेळी त्यांना सुवर्णपदक देण्यात आले. वयाच्या २०व्या वर्षी, १९३७ साली, बिस्मिल्ला खान यांनी कलकत्ता येथे भरलेल्या अखिल भारतीय संगीत संमेलनात आपल्या सुरेल शहनाई वादनाने तीन सुवर्णपदके पटकाविली होती.

भारताला स्वातंत्र्य मिळालेल्या दिवशी, १५ ऑगस्ट १९४७ रोजी, दिल्लीतील राष्ट्रपती भवनात बिस्मिल्ला खान यांचे निमंत्रित पाहुण्यांसमोर सुरेल असे शहनाईवादन झाले. पहिल्या प्रजासत्ताक दिनानिमित्त २६ जानेवारी १९५० रोजी दिल्लीच्या इतिहास प्रसिद्ध लाल किल्ल्यावरून त्यांच्या शहनाईचे मधूर स्वर गुंजून उठले.

बिस्मिल्ला खान यांचे नाव व त्यांच्या सनईचे मंजुळ स्वर भारतात घरोघरी पोचले.

**सन्मान**

भारतीय स्वातंत्र्याच्या व भारतीय प्रजासत्ताकाच्या सुवर्णमहोत्सवानिमित्त आयोजित दिल्ली येथील समारंभात बिस्मिल्ला खान यांच्या सनईचे आवर्जुन कार्यक्रम करण्यात आले. संगीत अकादमीने १९५६ साली त्यांना विशेष अॅवॉर्ड दिले. त्यांच्या संगीत सेवेची दखल घेवून भारत सरकारने त्यांना १९५८ साली पद्मविभूषण हा किताब बहाल केला. १९६२ साली अफगाण स्वातंत्र्यदिनी बिस्मिल्लांची सनई निनादून गेली. त्यावेळी त्यांचा खास सत्कार करण्यात आला. १९६५ मध्ये भरलेल्या एडिनबरो येथील जागतिक संगीत महोत्सवात बिस्मिल्लांनी आपले संगीतातील प्रभुत्व व श्रेष्ठत्व निर्विवादपणे सिद्ध केले व भारताची शान व मान उंचावली.

इराणमध्ये इस्लामिक क्रांतीचा १५वा वर्धापनदिन साजरा करण्यात आला तेव्हा बहामाल येथील सांस्कृतिक केंद्रात बिस्मिल्ला खान यांची चार तासांची मैफिल रंगतदारपणे रंगून गेली. कार्यक्रम संपताच सदर केंद्राला 'शहनाईवादक उस्ताद बिस्मिल्ला खान केंद्र' असे नाव देत असल्याचे सरकारतर्फे जाहीर करण्यात आले व टाळ्यांचा एकच कडकडाट झाला. त्यांच्यावर स्तुतिसुमनांचा व अभिनंदनाचा वर्षाव करण्यात आला. "आपला गौरव अभूतपूर्व असा आहे." अशी प्रतिक्रिया नंतर त्यांनी वार्ताहरांकडे व्यक्त केली.

कॉमनवेल्थ आर्टस फेस्टिवलमध्ये बिस्मिल्लांच्या सनई ह्या मंजूळ वाद्याने भारताची शान वाढविली. त्या फेस्टिव्हलमध्ये जगातील तमाम संगीत रसिकांचे लक्ष बिस्मिल्लांनी आपल्याकडे वेधून घेतले. अमेरिकेतील लिंकन सेंटर, फिलहार्मोनिक हॉल ह्यासारख्या विश्वविख्यात केंद्रांमध्ये शहनाईची मैफिल भरवून बिस्मिल्लांनी रसिकांना नादावून व वेडावून लावले. एवढ्याशा दिसणाऱ्या वाद्यांतून किती मंजूळ स्वर निघू शकतात हे बऱ्याच जणांना खरेच वाटत नव्हते. वॉशिंग्टन, लंडन, पॅरिस, मॉस्को या शहरांमधून तसेच इराण, इराक, सौदी अरेबिया, जपान, नेपाळ, हॉलंड, पाकिस्तान, जर्मनी, ऑस्ट्रेलिया इत्यादी अनेक देशांतून आणि

जगभरच्या राजधान्यांतून बिस्मिल्ला खान यांनी आपल्या जादुभरी शहनाई वादनाने दिगंत कीर्ती व भरपूर पैसा मिळविला. बिस्मिल्ला खान यांच्यामुळेच भारताचे वैशिष्ट्य असलेल्या सनईचे सूर जगभर गुंजत असतात. त्यांच्या सनईवादनाच्या असंख्य रेकॉर्डस् व टेप्स निघाल्या आहेत व सतत निघत असतात.

गुरुदेव रविंद्रनाथ टागोर यांनी स्थापन केलेल्या विश्वभारती विश्वविद्यालयाने बिस्मिल्ला खान यांना सन्माननीय डॉक्टरेट पदवी देऊन सन्मानित केले आहे. राष्ट्रीय सांस्कृतिक संघटनेने तर त्यांना 'अखिल भारतीय शहनाई चक्रवर्ती' ही पदवी देऊन गौरविलेले आहे. भारत सरकारने २००१ साली 'भारतरत्न' हा सर्वश्रेष्ठ किताब देऊन त्यांचा यथोचित गौरव केला आहे.

**संगीतकारांचे कुटुंब**

बिस्मिल्ला खान यांचे कुटुंब म्हणजे संगीतकारांचे कुटुंब. भाऊ, चुलते, पुतणे, सासरे, मामा, व त्यांची सहाही मुले. हे सर्व संगीताच्या दुनियेशी संबंधित आहेत. त्यांचा एक मुलगा उत्कृष्ट शहनाईवादक तर दुसरा एक मुलगा तबलापटू झालेला आहे. वाराणासी (काशी) जवळील 'सरणदारा' ह्या त्यांच्या बंगलीत साधारण १०० कुटुंबियासमवेत बिस्मिल्ला खान एखाद्या शहेनशहासारखे राहतात. साधी राहणी, स्वच्छता व टापटीप यांची त्यांना आवड आहे.

''साधारण चाळीस वर्षांपूर्वी मी संगीतातील सर्वोच्च शिखर गाठलेले आहे असे मला वाटत होते. पण तो भ्रम होता ते मला आता वाटते. मी नदीच्या ऐलतिरी डुबक्याच मारल्या आहेत. पैलतीर गाठणे हे कठीण काम आहे.'' असे मार्मिक विचार त्यांनी हल्लीच व्यक्त केले होते.

**आठवणी**

''आपल्या काही आठवणी सांगा'' असे पत्रकारांनी विचारल्यावर, ''तशा पुष्कळ आठवणी आहेत (सांगण्यासारख्या) पण मला अतिशय भावलेल्या आठवणी तेवढ्याच सांगतो.

''इराणचे शहा अधिकारावर असताना त्यांनी मला खास मैफिलीसाठी आमंत्रित केले होते. इराणच्या दूरदर्शनवर माझ्यासाठी खास असा कार्यक्रम त्यांनी आयोजित

केला होता. त्यामुळे सर्वजण मला ओळखू लागले. मी रस्त्यावरून फिरत असताना बस व मोटारीतून जाणारे लोक खिडकीतून हात बाहेर काढून, ''बिस्मिल्ला खान, सलाम आलेकुम' म्हणून अभिवादन करीत. शहांच्या आज्ञेवरून त्यांच्या भगिनीने आम्हा सर्वांना अशा काही शाही इतमानाने वागविले की, सांगायाची सोय नाही. पुन्हा इराणला येणार असे वचन घेवूनच त्यांनी आमची बिदागी केली. पुढे शहा पदच्युत झाल्यामुळे नंतर इराणला जाण्याची संधी मिळाली नाही.''

''योगायोग कसा असतो बघा! काही वर्षानंतर अमेरिकेच्या दौऱ्यावर असताना वॉशिंग्टनमध्ये माझा कार्यक्रम ठरला होता. शहा एव्हांना अल्लाघरी गेले होते. मी दुपारी माझ्या हॉटेलच्या लॉबीत सहज बसलो होतो. शहांची बहीण त्याच हॉटेलमध्ये राहत असते असे मला कुणीतरी सांगितले. मी त्यांना भेटण्याची इच्छा हॉटेलच्या सेवकांकरवी प्रदर्शित केली. पण त्यांच्याकडून प्रतिसाद लाभला नाही. त्याच संध्याकाळी मैफिलीला जाताना हॉटेलच्या मुख्य दरवाज्याजवळ शहांची भगिनी सामान्य नागरिकांप्रमाणे बाहेर जाताना दिसली. मी हसून त्यांना अभिवादन केले. त्यांनीही हसून प्रतिसाद दिला. काही क्षण त्या घुटमळल्या पण पुढच्याच क्षणी चेहऱ्यावर ओशाळा भाव दर्शवीत त्या तिथून झरझर बाहेर निघून गेल्या त्यांच्या चेहऱ्यावर, 'एकेकाळी आमची कसल्या वैभवात गाठ पडली होती व आता कुठल्या परिस्थितीत भेटत आहोत' असा भाव होता! मला फार वाईट वाटले. ते विचार झटकून मी मैफिलीच्या ठिकाणाकडे निघून गेलो. परंतु ती आठवण अजूनही माझा पिच्छा सोडत नाही.''

''दुसरी एक आठवण १९६२ सालाची. भारतीय वकिलातीतर्फे पाकिस्तानात बड्या मंडळीच्या मैफिलीसाठी गेलो होतो. प्रवेश फक्त मोजक्याच मंडळींना व निमंत्रणावरूनच होता. मैफिल संपवून हॉटेलवर निघताना १५-२० रसिकांनी दरवाजाबाहेर घेरले व म्हणाले, ''खाँ साब! आम्ही संगीताची रसिक मंडळी; पण कफल्लक! आपली बिदागी देण्याची ताकद आमच्यात नाही. जमेल तेवढे पैसे देऊ. आपली शहनाई ऐकण्याची इच्छा मात्र अपार आहे.'' मी क्षणभर विचार केला व त्यांना दुसऱ्या दिवशी सकाळी हॉटेलवर यायला सांगितले. खरोखरच ते लोक दुसऱ्या दिवशी आले. सर्वजण संगीतातले दर्दी होते. त्यांच्यासाठी म्हणून

वादनाला बसलो. त्यांचा प्रतिसाद व उत्साह पाहून चार तास त्यांना निरनिराळे राग गाऊन तृप्त केले. तशी मैफिल पुन्हा कधी सजली नाही.''

''गूंज उठी शहनाई' ह्या चित्रपटाचे संगीत दिग्दर्शन करून अतिशय सुरेल अशा शहनाई संगीताने त्यांनी सिनेरसिकांची मने जिंकली आहेत. आज 'शहनाई' म्हटल्याबरोबर रसिकांच्या डोळ्यांसमोर बिस्मिल्लांची मूर्ती उभी राहते; यातच त्यांचे सर्वोच्च यश सामावलेले आहे.

आपली हयातभर संगीताची तपस्या केलेल्या या योग्याने आपले कान टोचून घेवून त्यात चांदीच्या लहान, सुंदर सनई अडकवून घेतल्या आहेत. वास्तविक मुसलमानांमध्ये पुरुषांचे कान टोचण्याची प्रथा नाही. त्यामुळे मुसलमानांना 'अविंध' असे एक नाव आहे. कान टोचून घेण्यावरून अनेकदा त्यांची छेडछड काढली जाते. अनेक तऱ्हेचे प्रश्न पण त्यांना विचारले जातात. पण त्याचे कारण मात्र त्यांनी कुणालाही सांगितले नाही. ती त्यांची मर्मबंधातली ठेव असावी.

भारतरत्न उस्ताद बिस्मिल्ला खान यांच्या चिरंजीवी सनईचे मधुर सूर त्यांच्या पश्चातही गुंजतच राहणार आहेत.



# प्रज्ञावंत संगीतकार – पंडित कुमार गंधर्व

''भारतीय शास्त्रीय संगीतातील अनभिषिक्त सम्राट. 'घराणा'पद्धती झुगारून स्वतंत्र शैली निर्माण करणारे थोर गायक, पद्मविभूषण पंडित कुमार गंधर्व यांचे पहाटे ३.३० वाजता देवास येथील आपल्या निवासस्थानी अल्पशा आजाराने निधन झाले. ते ६७ वर्षांचे होते. संपूर्ण सरकारी इतमामात सायंकाळी त्यांच्यावर अंत्यसंस्कार करण्यात आले.''

ही बातमी वाचली व मन सुन्न झाले. तो दिवस होता ११ जानेवारी १९९२. त्यांच्या मैफिली, त्यांचे गाणे व त्यांचा जीवनपट डोळ्यासमोरून झरझर सरकू लागला.

संगीताकडे आध्यात्मिक दृष्टिकोनातून पाहणारे अनेक कलावंत आहेत. नादब्रह्मातून ब्रह्माशी एकतानता साधणे, त्यासाठी स्वरांचे माध्यम बनविणे, व त्याचे स्तोम माजविणारे असंख्य गायक आहेत. पण कुमारांना हा दृष्टिकोन अमान्य होता. ते सर्वार्थाने जीवनदायी व जीवनवादी कलाकार होते. आनंद, सुख-दुःख, शोक, विरह, अशी जीवनातील भावनांची अभिव्यक्ती करण्याचे साधन म्हणून ते संगीताकडे पाहत असत. आपल्या गायकीतून रंग, रूप, रस, स्पर्श, गंध या जाणिवांचे प्रतिबिंब उमटले पाहिजे असा त्यांचा अट्टाहास होता.

निर्भय प्रयोगशीलतेने कुमारांनी संगीत क्षेत्रात बंडखोरी केली. आपल्या मेहनतीने व शिस्तीने आपल्या बंडखोरीला त्यांनी महत्तता प्राप्त करून दिली.

**बालपण / मैफिली**

कर्नाटकातील बेळगाव जिल्ह्यातील सुळेभावी ह्या चिमुकल्या खेड्यातील एका लिंगायत कुटुंबात ७ एप्रिल १९२४ रोजी शिवपुत्र सिद्रामप्पा कोमकली यांचा जन्म झाला. त्यांची मातृभाषा कन्नड, वडील सिद्रामप्पा हे ख्यातनाम सतारवादक व गायक होते. शिवपुत्रांचे वडील गावच्या देवळाचे पुजारी होते. त्यामुळे लहान वयातच त्यांना शास्त्रीय संगीताबरोबरच भजनांची आवड पण निर्माण झाली.

वयाच्या पाचव्या वर्षी आपल्या वडीलांबरोबर ते सवाई गंधर्व यांची मैफिल ऐकायला गेले होते. घरी परतल्यावर त्यांनी गंधर्वांच्या गायनातील वसंत रागातील बंदिश आलाप व तानांसह सहीसही नक्कल करून दाखविली. ते ऐकून सारेजण चकित झाले. त्या काळातील सर्व समर्थ गायकांचे गाणे (रेकॉर्ड) ऐकून ते तंतोतंत म्हणून दाखवित असत.

लिंगायत समाजाच्या मठाधिपतींसमोर वयाच्या सहाव्या वर्षी शिवपुत्रांचे गायन झाले. ध्वनिमुद्रिकांतील अवघड जागा, बेहाय बेहलावे उचलण्याची व गाताना त्या सादर करण्याची तरकीब पाहून मठाधिपती खूष झाले व त्यांनी 'कुमार गंधर्व' ही पदवी त्यांना बहाल केली. तेच पुढे त्यांचे विशेषनाम बनले.

१९३५ साली मुंबईतील जीना हॉलमध्ये संगीत महोत्सव होता. भारतातील अग्रगण्य गायकांनी हजेरी लावली होती. समारंभाच्या शेवटी नऊ वर्षांचे कुमार स्टेजवर अवतीर्ण झाले. डौलदार शेरवानी, गळ्यात बिल्ल्यांचा पट्टा, ऐटबाज टोपी, सुरवार चढविलेली अशा साडेतीन फूट उंचीच्या या मूर्तीने एंट्री घेतली. पूर्वी गयिलेल्या सर्व अतिरथी महारथी पंडीत व खाँसाहेब यांच्या गायनाची त्यांनी साधारण पाऊण तास नक्कल करून सर्वांना दिङमूढ करून सोडले. पुढे दोन-चार वर्षे कुमार नकलांचे जलसे करीत फिरत होते.

त्यानंतरही अलाहाबाद येथे भरलेल्या संगीत संमेलनात खानसाहेब अब्दुल

करीम खान, उस्ताद फैय्याज खान, पं. विनायकराव पटवर्धन, प्रा. बी. आर. देवधर अशा दिग्गजांसमोर दहा वर्षांच्या ह्या बालकाने आपली चमक दाखविली.

### संगीत शिक्षण

कुमारांची चमक बघून प्रा. देवधर प्रभावित झाले होते. सिद्रामप्पाशी बोलून त्यांनी कुमारना १९३६ साली आपल्या 'देवधर स्कूल ऑफ इंडियन म्युझिक' ह्या संस्थेत प्रवेश दिला. कुमार आपल्या गुरुंच्या घरीच त्यांच्या मुलाप्रमाणे पुढे अकरा वर्षे राहिला व आपले संगीत शिक्षण पूर्ण केले.

भारतातील अनेक घराण्यांचे उस्ताद देवधरांकडे उतरत असत. रात्रभर त्यांची मैफल चाले. कुमार त्या लक्षपूर्वक ऐकत असत. उस्तादांची मैफल संपली की, हा छोटा उस्ताद मग नक्कल करून सुरांचे सप्तरंगी इंद्रधनुष्य प्रकट करीत असे.

देवधरांनी त्यांना रीतसर शास्त्रीय संगीत शिकविले. ते पाश्चात्य संगीताचेही जाणकार होते. कुमारांनी आपले गुरू देवधर व परात्परगुरू विष्णू दिगंबर पलुस्कर यांची ग्वाल्हेर घराण्याची गायकी आत्मसात केलीच, त्याबरोबर अन्य घराण्याच्या गायकीचाही अभ्यास केला.

देवधरांच्या घराजवळ गोव्यातील प्रसिद्ध गायिका श्रीमती अंजनाबाई मालपेकर राहत होत्या. त्यांनी कुमारांना गेल्या शतकातील अनेक बंदिशी व राग शिकविले. देवधर मास्तरांप्रमाणेच अंजनाबाई यांचेही कुमारांवर पुत्रवत प्रेम होते. आपल्या फुरसतीच्या वेळात कुमार अन्य विद्यार्थ्यांना संगीत शिकवीत असत.

वयाच्या अवघ्या बाराव्या वर्षी कुमार ''ऑल इंडिया रेडिओवर' गायिले. त्याचवर्षी एच.एम.व्ही. कंपनीने त्यांच्या गाण्याची पहिली रेकॉर्ड काढली. याच दरम्यान जे.बी.एच. वाडिया ह्या सिनेमादिग्दर्शकाने कुमारांवर एक लघुपट काढला. 'संगीत जगातील आश्चर्य' असलेला तो लघुपट वाडियांच्या पुढील चित्रपटांबरोबर भारतभर प्रदर्शित करण्यात आला. त्यामुळे अगदी लहान वयातच कुमारांना देशभरातील संगीत रसिक ओळखू लागले.

### स्वतंत्र वृत्तीला खतपाणी

संगीताचे कप्पे पाडण्यावर विश्वास नसलेला देवधरांसारखा गुरू मिळाल्याने

कुमारांच्या स्वतंत्र वृत्तीला खतपाणी मिळाले. पुढे स्वत:च्या तीव्र बुद्धिमत्तेच्या जोरावर त्यांनी आपली स्वतंत्र गायकी नावारूपास आणली.

नकला करणारे बालकलाकार म्हणून जरी कुमार पुढे आले तरी चिंतन व प्रयोगशीलतेने त्यांनी आपले अढळ स्थान निर्माण केले. त्यांनी निर्माण केलेला 'ट्रेंड' आज संगीत दुनियेत रूजला आहे, रूळला आहे.

मराठी गाण्याचे शब्दोच्चार कुमार आपणास स्वाभाविक असलेल्या कानडी ढंगाने करीत असत. त्यामुळे सुरुवातीच्या काळात बऱ्याच गमती-जमती घडत. एकदा बालगंधर्वांचे गाणे 'सुखविला नच जनक न माता' ही ओळ कुमार 'सुकविला नच जनख न माथा' अशी म्हणत. सुकविला आणि सुखविला; माता आणि माथा इ. शब्दांच्या अर्थातील फरक गुरूंनी दाखवून दिला. आज्ञाधारक विद्यार्थ्याप्रमाणे त्यांनी मग लगेच ती ओळ शुद्धपणे म्हणून दाखविली.

**नऊ वर्षांचा वनवास**

वयाच्या २३ वर्षी (१९४७) क्षयाचा दुर्धर असा रोग कुमारांना जडला. त्यांची पत्नी भानुमती कंस त्यांच्या माता बनल्या. सगळ्या प्रपंचाचा भार आपल्या माथ्यावर घेऊन त्यांनी कुमारांना सल्ला दिला, ''तुम्हाला गायला बंदी आहे. गाणे ऐकायला बंदी नाही ना?'' कुमारांनी तो सल्ला मानला. आजारपणातील प्रदीर्घ अशा नऊ वर्षांच्या काळात ''संगीत तत्वचिंतन व संगीत श्रवण'' हीच त्यांची साधना बनली. कुमारांचे गानयोगित्व आकाराला यायला तो काळ उपयोगी पडला. घरात पडल्यापडल्या कुमार गायकांचे गुणगुणणे लक्ष देऊन ऐकत असत. भानुमती मग ती गाणी जमा करायची व कुमार त्याचे नोटेशन लिहून ठेवायचे असा क्रम चालू झाला.

ज्या गायकीबद्दल कुमार पुढे प्रसिद्धीस आले ती अमर गायकी कधी व कोठे गवसली हे त्यांनी 'अनुपरागविलास' या आपल्या ग्रंथाच्या प्रस्तावनेत नमूद करून ठेवलेले आहे. ''त्याकाळी मी फार बैचेन होतो. वहिवाटीची गायकी तर गायची नव्हती व नवी वाट तर सापडत नव्हती. मला कित्येक वेळा रडु फुटायचे.'' भानुमतीला देवासच्या कन्याशाळेत मुख्याध्यापिकेची नोकरी मिळाली. स्नेही

गमूभय्या दाते व मामा मुजुमदार सतत कुमारांना धीर द्यायचे. कुमारांतील प्रतिभावंत मग चिंतन करू लागला. माळव्याच्या लोकगीतांचा व अन्य भाषांतील लोकगीतांचा त्यांनी अभ्यास केला. त्यातील गाभ्यात दडलेले संगीताचे विराट विश्वाचे बीजरूप त्यांना गवसले. या चिंतनातूनच त्यांनी 'धुन उगम' अशा रागांची निर्मिती केली.

**भानुमती**

गंधर्व विद्यालयात शिकायला अनेक विद्यार्थी-विद्यार्थिनी येत. नवीन विद्यार्थ्यांना कुमार शिकवित असत. त्यांच्यापैकी भानुमती कंस ह्या सुंदर तरुणीशी त्यांचा १९४७ मध्ये विवाह झाला. लग्नानंतर काही महिन्यातच कुमारांना क्षयरोगाचे निदान होऊन त्यांचे एक फुफ्फुस काढून टाकावे लागले. डॉक्टरांनी त्यांना हवा बदलासाठी दीर्घकाळच्या मुंबईबाहेर राहण्याचा सल्ला दिला. १९४८ मध्ये पती-पत्नी मध्यप्रदेशातील पूर्वीच्या एका संस्थानाची राजधानी असलेल्या देवासला गेले. तिथे कुमारांनी 'माताजीच्या टेकडी'च्या पायथ्याशी जागा घेतली. कालांतराने तिथे 'भानुकुल' नावाची बंगली बांधली व तिथेच रहायला लागले ते शेवटपर्यंत.

भानुमती कुमारांना एखाद्या राजपुत्रासारख्या जपत होत्या. ती स्वत:ही राणीसारख्या दिसायच्या व तशाच रहायच्या. वागायच्याही एखाद्या राणीच्या रूबाबात. घरात देखभाल करायला मदतनीस म्हणून त्यांचा लहानपणाचा नोकर मदतीला होता. स्वतंत्र धोबी होता. देवासच्या शाळेत त्या मुख्याध्यापिका होत्या. शाळेत न्यायला व घरी आणायला त्यांची खाजगी घोडागाडी होती. कपडालत्त्याचा त्यांना शौक होता.

हळूहळू कुमार आजारपणातून बरे झाले. पण दुसऱ्या मुलाच्या बाळंतपणाच्यावेळी भानुमतीचे दु:खद निधन झाले. आयुष्यभराची सोबतीण म्हणून आलेली भानुमती त्यांना अकस्मात सोडून गेली. कुमार दु:ख सागरात बुडाले.

भानूच्या निधनानंतर काही दिवसांनी मांटुग्याला कुमारांचे गाणं ठरलं होतं. संयोजकांनी गाणं रद्द करण्याची तयारी दर्शविली. जगरहाटीत आपलं दु:ख फक्त आपणच भोगलं पाहिजे या विचाराने त्यांनी कार्यक्रम रद्द करण्यास नकार दिला.

मैफिल सुरू झाली. कुमारांचे गाणे श्रोते नेहमीच मंत्रमुग्ध होऊन ऐकतात. त्या दिवशी तर बैठक हळवी होऊन गाणं ऐकायला आली होती. कुमारांची तंद्री लागली. नेहमीप्रमाणेच गाना गाता नेहमीसारखे तंबोऱ्यावर बसलेल्या भानुला 'हा, बाबा' म्हणून सूर लावायला सांगितले. आज भानु तिथे असणार नाही याचं भानही त्यांना राहिलं नव्हते. जमलेल्या रसिकांना हुंदका आला. कुमारांच्या दु:खाची भव्यता त्याक्षणी प्रत्ययाला आली.

'अनुपरागविलास' या पुस्तकाच्या अर्पणपत्रिकेत कुमारांनी लिहिले आहे -

''भानुमतीला ......

जिने माझा प्रत्येक विचार व प्रत्येक कृती पारखून घेतली आणि दुसऱ्या कुणापाशी जाऊन पारख करवून घेण्याची गरज भासू दिली नाही.

जिने माझे विचार आपलेसे केले आणि आपल्या विचारांनी माझ्यामध्ये साहस निर्माण केले.

जिचे स्मरण केल्याशिवाय मी कधीच काही करू शकत नाही.''

**ठळक ठसा**

कुठल्याही गोष्टीची सुबक मांडणी हा कुमारांच्या गाण्याचाच नव्हे तर जीवनाचाच अविभाज्य भाग होता.

लहानपणापासूनच कोण कसा गातो, कोण कसा वाजवितो याचे बारकाईने अवलोकन करण्याची सवय लागल्यामुळे साधा लयबद्ध ठेकाच बैठक रंगविण्याच्या दृष्टीने आवश्यक असल्याचे त्यांचे मत होते. त्यामुळे मोठ-मोठ्या नामवंत तबलजींची नाराजी त्यांनी ओढवून घेतली होती. कुमारांच्या गाण्यात सुबक स्वर, लय, शब्द, अर्थ, उच्चार यांचेच अधिष्ठान असल्यामुळे त्यांच्या गानप्रतिष्ठेला यत्किंचितही बाधा आली नाही.

बैठकीची शिस्त, टापटीप, वक्तशीरपणा, सहकलाकारांचे वागणे, हावभाव, मूड, सौंदर्यदृष्टी अशा अनेक संगीतबाह्य गोष्टींचाही मैफिलीवर नकळत प्रभाव

पडत असतो अशी त्यांची भावना होती. बैठक कशी अंथरावी, तंबोऱ्यांना गवसणी कशी घालावी, कुणी फुलं दिली तर ती बैठकीवर कुठे व कशी रचावीत अशा प्रत्येक गोष्टीत त्यांची सौंदर्यदृष्टी दिसून येई. त्यांच्या शेकडो बैठकी झाल्या पण प्रत्येकवेळी काय गायचं याची योजना अगोदरच ठरलेली असे. स्पष्ट व सुंदर अक्षरात लिहून आणलेले छान कागद त्यांच्यासमोर असत. गाताना चे सहज हातवारे तसेच हावभाव नृत्याचा प्रत्यय आणून देत. त्यांच्या मैफिलीत श्रोता प्रसन्न वातावरणात तरंगत राही ते उगाच नव्हे!

पैसा आणि कला यांत पैशाला जिंकू न देण्याचा; आपला श्रोता आपला प्रेमी आहे हे जाणून ते वागायचे.

**गायकीची खासियत**

ग्वाल्हेर गायकीतील स्वरोच्चारांचा स्पष्टपणा व आखीव -रेखीव मांडणी; जयपूर घराण्यातील लयींचा डामडौल; आग्रा घराण्याचा आवेश. आणि किराणा घराण्याचा स्वरविभ्रम हे सर्व पंडित कुमार गंधर्व यांनी लीलया आत्मसात केले. या साऱ्यांना स्व-तंत्रात बांधून त्यांनी जी नवीन वाट रूळविली ती एक नवीन घराणे निर्माण करणारी ठरली.

गायला बसले की, कुमारांचे व्यक्तिमत्त्व बदलून जायचे. तालसुरात गुंडाळून जणु सप्तरंगी इंद्रधनुष्यच ते अलगदपणे मैफिलीत उलगडून दाखवायचे.

कुमारांच्या गायकीचे एक मनोज्ञ वेगळेपण म्हणजे त्यांची जाणीवपूर्वक तुटकपणा दर्शविणारी मांडणी. त्यातील अंतिम परिणाम कुमारांना ज्ञात असे. रसिकांच्या काळजाला हात घालण्यासाठी त्याचा सुरेख वापर ते करीत असत.

कुमारांचा आवाज काहीसा बारीकसा, किणकिणा परंतु अत्यंत मुलायम, निर्मळ व जात्याच हलका आणि कमालीचा सुरेल. त्यांची तान घेण्याची पद्धत श्रोत्यांच्या अंगावर रोमांच उभी करणारी. अचाट कल्पनाशक्ती, तरल सौंदर्यदृष्टी या गुणांमुळे त्यांच्या गाण्याने बैठकीत आनंदवादळ उठायचे.

त्यांच्या गाण्याचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे त्यांच्या चमत्कृतीपूर्ण

पद्धतीला अनपेक्षितपणे येणाऱ्या स्वरलहरीतून श्रोत्यांना अनन्यसाधारण असा आनंद मिळायचा आणि एका भारल्या अवस्थेत श्रोता मंत्रमुग्ध होऊन गाणे ऐकत राहायचा.

मैफिलीत सूर व लयींशी ते मनसोक्त खेळत व त्यांना खेळवीतही. त्यांच्या खोड्या काढीत, थट्टा करीत, गुदगुल्या करीत, गोंजारीत, त्यांच्या खांद्यावर हात टाकून त्यांच्याशी कानगोष्टी करीत. रसिक श्रोता आश्चर्यचकित होऊन जाई.

### वसुंधरा

कुमारांच्या गाण्याने वेडे होऊन त्यांच्यावर जीव पाखडणारे रसिक त्यांच्या मैफिलीत हजेरी सातत्याने लावीत. त्यातच वसुंधरा श्रीखंडे ही एक मुलगी होती. कुमार आणि भानू यांच्याबद्दल आदर व पुण्यभाव असलेली ती एक संगीतवेडी होती.

भानुमतीचे निधन होऊन महिनाभर झाला होता. त्यांचे स्नेही वामनराव देशपांडे देवासला गेले होते. कुमारांचा आजार, प्रकृती, दोन लहान मुले, त्यांचं गाणं याचा विचार करून कुमारने दुसरे लग्न करावे असा सल्ला त्यांनी दिला. त्यांनीच वसुंधरेचे नाव सुचविले.

भानूच्या निधनानंतर इतक्या लवकर लग्न केलं तर लोक काय म्हणतील याची कुमारांना भीती होती. ''लोकांना फुकटचं बोलायला काय जातं? आपले प्रश्न आपणच सोडवायचे असतात,'' हा वामनरावांचा प्रेमळ सल्ला कुमारांना पटला. अशा प्रकारे वसुंधरा श्रीखंडे यांच्याशी त्यांचा द्वितीय विवाह पार पडला.

वसुंधरा भानुमतीपेक्षा कुठेच उणी नव्हती. गाण्याच्या बाबतीत तर उजवीच होती. कुमारांची प्रकृती, घर, संसार, व्यवसाय, व्यासंग सगळे काही त्यांनी मनापासून सांभाळले. कर्तबगारीने सुखदु:खात साथ दिली. सख्खं व सावत्र मूल असा भेदभाव कधी केला नाही.

### मुक्तचिंतन

कुमारांनी गाणे कंठस्थ केले पण आपले शिक्षण सोडून दिले नाही. भारतीय

परंपरेची त्रिसूत्री–दिक्षा, शिक्षा व परीक्षा; त्यांनी कसोशीने पाळली. विधीवत शिक्षण घ्यायचे, गुरू करायचा पण सर्व काही पारखत, तपासीत रहायचे.

"लोकसंगीतातून रागसंगीत निर्माण झाले असे जुने लोक म्हणतात. पण ते कसे झाले याचा खुलासा मात्र कुणी करीत नाही. मी ते तपासायचे ठरविले. धुना मिळवित गेलो. गीत लिहून घेतले की, मी त्याचे स्वर लिहनू ठेवायचो. शब्दातलं गीत वेगळं व धून वेगळी. लोकगीतं हा फार मोठा 'कॅनव्हास' आहे. पण सगळ्याच गीतांमधून, धुनांमधून रागनिर्मिती होईलच असे नाही." कुमारांनी हे आपले विचार प्रकटपणे मांडले होते.

"खर्जाची मेहनत हे एक फॅड आहे." असे एक धक्कादायक विधान त्यांनी केले होते.

रागदारीच्या चिजा म्हणजे स्वर टांगण्यासाठी केलेल्या खुंट्या अशी सर्वसाधारण समजूत. पण कुमारांनी स्पष्टपणे सांगितले की, "संगीतात स्वरांइतकेच महत्त्व शब्दांना पण आहे. नादब्रह्मांचं स्वरूप म्हणजे शब्दब्रह्म. म्हणून स्वरांइतकच महत्त्व शब्दांनाही द्यायला हवं."

आपल्या संगीताचा उगम हा सामवेदापासून झालेला आहे, ह्या लोकप्रिय समजुतीलाही कुमारांनी हादरा दिला होता.

"ढोरमेहनतीने गाणे येत नाही." "गायनात तान म्हणजे उत्कर्ष बिंदू नव्हे." एखाद्यावेळी गाणे जमत नसेल तर तो राग सोडून द्यावा. उगाच पिसत बसू नये." हे आणखी काही कुमारांचे प्रसिद्ध विचार.

साहित्य, कला, तत्त्वज्ञान, निसर्ग याबद्दल त्यांना विशेष आस्था होती. मंगेश पाडगांवकर, वसंत बापट, विंदा करंदीकर, द.रा.बेंद्रे, शिवमंगल सिंह सुमन हे त्यांचे जवळचे साहित्यिक मित्र. कबीर, सूरदास, मीरा, तुलसी, तुकाराम यांच्या प्रत्येक रचनेवर ते राहुल बारपुत्यांसारख्या जाणकार मित्रांबरोबर सखोल चर्चा करीत. पूर्णपणे समजून घेतल्यानंतरच ते स्वरबद्ध करायचे.

"ईश्वरावर तुमचा विश्वास आहे काय?" या प्रश्नावर कुमारांचे उत्तर मार्मिक

आहे. ''माझं गायनावर प्रेम आहे. गायन हाच माझा ईश्वर आहे. आपण निसर्गाचाच एक भाग आहोत. एक चालते बोलते झाड आहोत. ईश्वराकडे याचना करणे मला पटत नाही. हे एवढं मोठं विश्व आहे. आणखी काय हवंय तुम्हाला? त्याचा उपयोग करायचा सोडून ईश्वराकडे याचना कसली करायची? तो आळशीपणा आहे. मी देवदर्शनाला वगैरे जात नाही. मी कोणाचं वाईट करीत नाही. मग भ्यायचं कशाला? माझा स्वत:वर विश्वास आहे.''

**छंद**

सौंदर्याचे कुमारांना उपजतच वेड! छान छान चित्रे गोळा करणे, रंगवणे तसेच पुस्तकांना मोहक वेष्टने घालणे हा त्यांचा लहानपणाचा छंद होता.

सगळ्या सूक्ष्मकला एकमेकांशी निगडीत, परस्परावलंबी आहेत अशी त्यांची भावना होती. शिल्पकला, चित्रकला, वास्तुशास्त्र, साहित्य हे सर्व जाणून घेतले पाहिजे अशी त्यांची धारणा होती. मुंबईत आल्यावेळी जहांगीर आर्ट गॅलरीत चक्कर टाकल्याशिवाय ते राहत नसत. एखादा आगळा चित्रपट लागला तरी हजेरी लावायचे. काव्यात तर त्यांना विशेष रस होता.

आगळेवेगळे दगड, विविध वनस्पतींच्या काठ्या, साळुंक्याचे जथे अशा कितीतरी गोष्टींचा संग्रह त्यांनी करून ठेवला होता. देवासमधील आपले निवासस्थान 'भानुकुल' ह्या बंगल्याभोवती यांनी सुरेख बाग तयार केली होती. अंगणात मोठे पारिजातकाचे झाड बहरले होते. त्या खाली झोपाळ्यावर बसून मजेत झोके घेत बसणे हा त्यांचा आणखी एक छंद होता. देवासकडे पारिजातकाला 'हरिप्रिया' म्हणतात असे बाहेरून आलेल्या पाहुण्यांना आवर्जून ते सांगत असत.

मुकुलचा मुलगा भुवन (नातू) याच्याशी रंगून क्रिकेट खेळणे हा त्यांचा आणखी एक आवडीचा छंद होता.

कुमारांचा निवडक मित्रपरिवार होता. ते स्वत: साधे जेवण घेत व थोडेच खात. उत्तम गाईच्या तुपाचे आचमन मात्र करीत. रात्री स्पॅनिश केशर घातलेले दूध पिणे हा त्यांचा शौक होता. आपल्या मित्रमंडळींना घरी बोलावून त्यांना

उत्तमोत्तम पदार्थ करून आग्रहपूर्वक जेवायला घालणे ही कुमार, भानू, व नंतर वसुंधरा यांची एक खासीयत होती.

देवधरांकडे शिकायला असताना सायंकाळी ते आपल्या सवंगड्यांसह चौपटीवर फिरायला जायचे. तिथे उंचउंच पतंग उडविणे यात ते रमून जात. पैजेवर गोट्या खेळून ४-८ आणे मिळवायचे. दमल्या भागल्यानंतर कुलकर्णी हॉटेलमध्ये भजी खाऊन मग घरी परतायचे.

'सजन-मिलाप' ह्या बुजुर्ग संस्थेतर्फे काही नामवंत कलाकारांचा सत्कार सोहळा होता. कुमार एक सत्कारमूर्ती होते. संयोजकांनी नाव पुकारताच एक मुलगी व्यासपीठावर येऊन पुष्पगुच्छ देऊन जायची. कुमारांचे नाव पुकारताच ती मुलगी पुष्पगुच्छ घेऊन व्यासपीठावर आली. इकडून तिकडे व तिकडून इकडे अशी तिनं एक फेरी मारली. कुमार कोण हे तिला माहिती नसावे. कुमारांच्या ते लक्षात आले. ''बाई मी इथे आहे.'' असं म्हणून त्यांनी शाळकरी मुलासारखा आपला हात वर केला. सारे सभागृह हास्यकल्लोळात बुडाले. त्या मुलीने मग लाजून त्यांना पुष्पगुच्छ दिला व तिथून पळ काढला.

झपताल हा द्रुतलयीत गाण्यासाठी नाही, हे सांगताना ते गमतीदार उदाहरण देत. ''हत्ती जर धावू लागला तर ते सुंदर दिसेल की, बेढब?'' असे ते मिष्किलपणे विचारीत.

**नवीन रचना**

कै. गोविंदराव टेंबे यांनी कुमारांना ''संगीत विश्वातील प्रश्नचिन्ह'' असे म्हटले होते. पण त्यांच्या हयातीतच या प्रश्नचिन्हाचे उद्गार चिन्हात रूपांतर झालेले त्यांना पहायला मिळाले.

कुमारांनी आपली प्रतिभा वापरून अनेक नवीन कार्यक्रम सादर केले. बालगंधर्वांच्या निवडक गाण्यांचा ''मला उमजलेले बालगंधर्व'' हा कार्यक्रम सादर केला. ''गीतवसंत, गीतवर्षा व गीतहेमंत'' अशी ऋतूंच्यावर आधारित गाणी सादर केली. ''मालवाकी लोकधुने'' हा त्यांचा आणखी एक बहारदार

कार्यक्रम. ''तुलसी एक दर्शन'' व ''तुकाराम एक दर्शन'' असे दोन दर्जेदार कार्यक्रमही त्यांनी सादर केले. ''राग दर्शनमाला'' नावाचा रागांचे दर्शन घडविणारा अनोखा कार्यक्रम आखला. ''ठुमरी, टप्पा, तराणा'' हा त्यांचा कार्यक्रमसुद्धा अतिशय गाजला.

कबीर, सूरदास, मीरा ह्या संतांची निवडक भजने घेऊन 'त्रिवेणी' कार्यक्रम सादर केला. ''निर्गुणी भजन'' सादर करून नाथपंथीयांचे तत्त्वज्ञानसार प्रकाशात आणले. ओबडधोबड लोकसंगीताला त्यांनी आपल्या स्वरांच्या परिसस्पर्शाने प्रतिष्ठा प्राप्त करून दिली.

शोधक वृत्तीचा हा बुद्धिमान कलावंत परंपरेच्या जोखडात स्वत:ला बांधून न घेता भावगीत गायला पण तयार झाला. ''आज अचानक गाठ पडे.'' ''अजूनी रूसूनी आहे.'' ''कोणा कशी कळावी, वेडात काय गोडी.'' ''ऋणानुबंधाच्या, जिथून पडल्या गाठी'' (वाणी जयराम बरोबर) अशी अवीट गोडीची भावगीते गाऊन त्यांनी अजरामर केली. तीनताल या परंपरागत ख्यालगायकी बरोबरच कुमारांनी 'मध्यलय' रसिकांत रूजविली.

कुमारांच्या अनेक खेळकर चीजा मशहूर आहेत. ''रंग ना डारो श्यामजी'' ''सावरे आई नईये'' ''म्हारा ओळखिया घर आया री'', ''जानेवाला शोणावे मेरा भी साथ निभाना'' या चीजा लोकांच्या तोंडात आजही सतत घोळतात.

आपल्या व्यासंगासाठी ध्वनिमुद्रित संगीताचा मोठा संग्रह करून त्याचा ते सातत्याने अभ्यास करीत असत. ''व्यासंगाला पर्याय नाही'' असे ते गंभीरपणाने सांगत.

महाकोशल, अवधी, ब्रिजभाषा, माळवी, राजस्थानी, मैथिली अशा अनेक लोकभाषांचा व त्यातील लोकगीतांचा अभ्यास ते सातत्याने करीत असत. काही नवीन शब्द आवडले तर संगीतात त्यांना आणायचे. महाशोकल भागातील लोक ''ऐसा कैसा''ला ''ऐसन कैसन'' म्हणतात हे त्यांच्या लक्षात आले. लगेच त्यांनी 'कामोद' रागात 'ऐसन कैसन बरसत बरखा'' ही चीज बांधली.

विद्यार्थ्यांना शिकविण्यासाठी म्हणून त्यांनी १९५५ मध्ये "कुमार संगीत अकादमी" ची स्थापना केली.

**टीका व मानसन्मान**

वयाबरोबर अनुकरणाचा मोह मागे पडला व कुमारांतील स्वतंत्र स्वभाव बंडखोरी करून उफाळून वर आला. तेव्हापासून कुमार व वादविवाद हे समानार्थी शब्द झाले.

"कुमार हे प्रचलित राग गात नाहीत व जे राग ते गातात ते लोकांच्या डोक्यावरून जातात." हा त्यांच्या गायकीवरील एक प्रमुख आरोप होता.

प्रसिद्ध कादंबरीकार ना.सी. फडके तर चवताळून, "काय तो तुमचा कुमार! करवतीनं बालगंधर्वांचं गाणं कराकरा कापतो आणि तुम्ही त्याला डोक्यावर घेता?" असे विचारीत.

एक गोष्ट मात्र खरी होती. सुळेभावीतील बालपणातला कन्नड भाषेचा संस्कार त्यांच्यावर शेवटपर्यंत टिकून होता. उदा. 'ओ'चा नेहमी ते 'वो' करून गायचे

जसे टिकाकार होते तसे त्यांचे असंख्य चोखंदळ चाहतेपण होते. जेष्ठ गायिका डॉ. प्रभा अत्रे यांनी कुमारांचा गौरव, "संगीत क्षेत्रात यावनी अंमल असतानाही कुमार गाण्यात हिंदू अविष्कार घेऊन आले व घट्ट स्थिरावले." असा केला आहे.

संगीत क्षेत्रातील अद्वितीय कामगिरीबद्दल उज्जैनच्या विक्रम विद्यापीठाने तसेच अखिल भारतीय गंधर्व विद्यापीठाने कुमारांना संगीतातील सन्माननीय डि.लिट. पदवी घेऊन गौरविलेले होते. तसेच भारत सरकारने 'पद्मविभूषण' किताब देऊन त्यांचा सन्मान केला होता.

मध्यप्रदेश सरकारने 'कालिदास सन्मान पुरस्कार' देऊन त्यांचा बहुमान केला. १९७४ मध्ये संगीत नाटक अकादमीने त्यांना फेलोशिप दिली. अनेक नगरपालिकांनी त्यांना मानपत्र देऊन वेळोवेळी सन्मान केलेला आहे.

दूरदर्शनने काही वर्षांपूर्वी कुमारांच्या जीवनावर सुंदर असा लघुपट तयार करून

प्रदर्शित केला होता.

कुमारांच्या पश्चात त्यांची पत्नी वसुंधरा, मुलगी कपालिनी व मुलगा शिवपुत्र (उदयोन्मुख प्रतिभाशाली गायक); हे कुमारांचा गायनातील वारसा भक्कमपणे पुढे चालवीत आहेत. शिवाय त्यांचे अनेक शिष्य व अन्य लोक त्यांची गायकी पुढे चालविण्याची खटपट करीत असतात. परंतु अजूनपर्यंत तरी कुणीही कुमारांची उंची गाठलेली नाही.

**श्रद्धांजली**

कुमारांच्या निधनाची वार्ता पसरली, तेव्हा असंख्य रसिक हळहळले. त्याचप्रमाणे अनेक नामवंतांनी आपली श्रद्धांजली त्यांना अर्पण केली.

ख्यातनाम लेखक व संगीताचे चाहते पु.ल. देशपांडे म्हणाले, ''भारतीय संगीतक्षेत्रात अनेक प्रतिभावंत होऊन गेले. पण कुमार हा 'या सम हाच' असा होता. कुमारांची कलानिर्मिती म्हणजे प्रतिभा, प्रज्ञा व परिष्करण यांचा सुंदर मिलाफ आहे; गाण्यातील विशिष्ट रसायन होते. कोणीही त्यांच्यापर्यंत पोचू शकत नाही. खऱ्या अर्थाने ते 'गंधर्व' पदवीला शोभून दिसत होते.''

लता मंगेशकर : ''ज्या संगीत क्षेत्रावर कुमार गंधर्व यांनी गेली अनेक दशके अधिसत्ता गाजविली, त्या भारतीय संगीत शास्त्राचा आत्माच अकाली लोप पावला.''

प्रख्यात संगीत शास्त्रज्ञ व समीक्षक डॉ. अशोक रानडे : ''दहा संगीतकारांना शंभर वर्षात जे साध्य करता आले नसते ते कुमारांनी एका आयुष्यात करून दाखविले.''

हृदयनाथ मंगेशकर : ''संगीतसूर्य मावळला''

कुमारांच्या निधनानंतर कर्नाटक, महाराष्ट्र, मध्यप्रदेश या तीनही राज्यांच्या मुख्यमंत्र्यांनी तसेच भारताचे राष्ट्रपती, उपराष्ट्रपती, पंतप्रधान व अनेक अग्रगण्य नेत्यांनी आपला शोक व्यक्त केला.

कुमारांना परदेशी प्रशस्ती किंवा परदेशवारी यांचा सोस नव्हता. ते आपल्या भूमीतच मस्तीत सगळीकडे संचार करून विद्या मिळवित असताना रसिकांचे कान तृप्त करायचे. फक्त एकदाच फ्रान्समध्ये झालेल्या भारत उत्सवात त्यांनी भाग घेतला होता. तेथेही त्यांनी आपला प्रभाव पाडला होताच.

संत कबीरांचे ''उड जायेगा, उड जायेगा हंस अकेला'' हे भजन कुमारांचे आवडते भजन होते.

आपल्या अगणित चाहत्यांना व रसिकांना दुःख सागरात बुडवून हा हंस अंतरिक्षात उडून गेला. परत कधीही न येण्याच्या वाटेवर.



# पाश्चात्य संगीताचा मानदंड – झुबिन मेहता

जगप्रसिद्ध व्हायोलिनवादक येहुदी मेनुहिन दुष्काळ पीडितांच्या मदतीसाठी कार्यक्रम करायला भारतात आले होते (१९५२), त्यावेळी झुबिन मेहता १५ वर्षांचे होते. झुबिनचे वडील मेहली मेहता यांना मेनुहिनच्या वाद्यवृंदात काम करण्याची संधी मिळाली होती. तालमीसाठी एकदा येहुदी मेनुहिनला यायला उशीर झाला. वाद्यवृंद त्यांच्याशिवाय खोळंबून राहिला होता. तेवढ्यात झुबिन तिथे पोचला. त्याने संगीत दिग्दर्शकाची काठी हातात घेतली व लहानग्या व्यासपीठावर चढला. जराही विचलित न होता तो संगीत दिग्दर्शन करू लागला. त्याचवेळी संगीत क्षेत्रातील एक चमत्कार उदयाला आला. तो चमत्कार पुढे मोठा होता होता सारं जग पादाक्रांत करून बसला. भारताने जगाला पाश्चिमात्य संगीतात चमकणारे बरेच तारे बहाल केले आहेत जसे संगीत दिग्दर्शक डॅनियला नझरेथ, पियानो वादक मरिलिना व हिला करसोटजी, व्हायोलिन वादक होमी कांगा, गायक पॅट्रिशिया, रोझरियो व झरीना घडियाली इत्यादी पण भारताची सर्वश्रेष्ठ देणगी म्हणजे झुबिन मेहता ! ''झुबिन'' याचा अर्थ ''शक्तीमान तलवार''. हे नाव झुबिन मेहता यांनी सार्थ केले आहे.

मुंबईतील एका पारशी कुटुंबात झुबिनचा जन्म झाला. आई नेहमीना व वडील

मेहलि मेहता. झुबिनच्या जन्मानंतर एका ज्योतिषाने भविष्य वर्तविले होते ''हे मूल आत्मविश्वासी, हुशार व आपल्या क्षेत्रात नेता म्हणून चमकेल. दुसऱ्यांना आपल्याबरोबर घेऊन जाण्यात हा मुलगा यशस्वी होईल.'' हे भविष्य पुढे तंतोतंत खरे ठरले. ''मुलाचे पाय पाळण्यात दिसतात'' अशी एक म्हण आहे त्याप्रमाणे अगदी लहानपणीच झुबिनचे संगीतातील सुप्त गुण दिसायला लागले होते. झुबिन दोन वर्षांचा झाला असताना त्याला आईने एकदा दोन शेंगा खेळायला दिल्या होत्या. शेंगा घेऊन तो दिवसरात्र कशावरही त्या वाजवत बसायचा. रात्री झोपायच्या वेळी पण शेंगा उशाखाली ठेऊन झोपायचा. कुणालाही त्यांना हात लावयला द्यायचा नाही.

**बालपण**

मेहता कुटुंब अकौंटंटची नोकरी करणाऱ्यापैकी होते. आजोबा न्यू इस्लाम कॉटन मिलमध्ये अकौंटंटची नोकरी करायचे. वडील बी.कॉम.परीक्षा पास झाल्यावर टॅक्स कलेक्टर म्हणून थोडे दिवस काम करीत असत. नंतर त्यांनी आपला परंपरागत असा पेशा झुगारून देऊन पाश्चात्य संगीतासाठी संगीत रचना करणारी पहिली 'सिंफनी' स्थापन केली. त्यावेळी मुंबईची वस्ती आजच्या मानाने फारच कमी होती. इंग्रज, पारशी, गोव्यातील ख्रिश्चन यांच्या व्यतिरिक्त अन्य कोणाला पाश्चात्य शास्त्रीय संगीतात विशेष रस नव्हता. बाल झुबिन वडिलांच्या वाद्यवृंदाच्या समवेतच मोठा होत गेला. झुबिन ९ वर्षांचा असताना त्याचे वडील व्हायॉलिन शिकण्यासाठी म्हणून न्यूयॉर्कला निघून गेले. तिथे इव्हान गॅला मारिन यांच्या मार्गदर्शनाखाली ते व्हायोलीन शिकायला लागले. चार वर्षांनी ते भारतात परतले तेव्हा त्यांची 'बॉम्बे सिंफनी' मोडकळीस आलेली होती. पण १३ वर्षांच्या झुबिनमुळे ती कशीबशी सावरून होती.

**धडपडीचे दिवस**

झुबिनची संगीताची आवड बघून वडिलांनी त्या काळात त्याला व्हायोलिन शिकवायला सुरुवात केली. आठवड्यातून एकदा पुण्याला पाश्चिमात्य संगीतातील बारकावे शिकण्यासाठी ओडोने साविनी यांच्याकडे ते झुबिनला पाठवायचे. पण तिथे झुबिन संगीताचे धडे न घेता क्रिकेट खेळत राहायचा. त्याला तंतुवाद्यात रस

नव्हता म्हणून मग वडिलांनी मुंबईतील सेंट झेवियर कॉलेजमध्ये झुबिनला दाखल केले. त्याने डॉक्टर व्हावे असे वडिलांचे मत होते. पाश्चात्य संगीताचे जाणकार भारतात फारच कमी आहेत त्यामुळे झुबिनला त्या क्षेत्रात फार मोठा वाव मिळणार नाही असे त्यांना वाटायचे. माणूस विचार करतो एक व घडते दुसरेच. याचा प्रत्यय झुबिनच्या बाबतीत आला. वयाच्या १८व्या वर्षी व्हियेन्ना येथे 'अॅकॅडमी फॉर म्युझिक' मध्ये पाश्चात्य शास्त्रीय संगीत शिकण्यासाठी झुबिन तिथे दाखल झाला. महिना ७५० रुपयांत गुजराण करावी लागे. पण पाश्चात्य शास्त्रीय संगीताच्या आराधनेसाठी त्याने कठोरपणे वास्तवतेशी सामना केला. उबदार कपडे यांच्या अभावी तो तिथे थंडीने काकडून जायचा. थोड्याच दिवसांत तो कोरसमध्ये दाखल झाला व आयुष्यातील पहिली रेकॉर्ड इथेच पाडली. सर्वांगाने जीवन जगण्याची उत्कंठा, प्रेमळ व उमदा स्वभाव यामुळे तो व्हियेन्नातील संगीत क्षेत्रात सर्वांचा लाडका झाला. इथेच कार्मेन तास्की या मुलीबरोबर त्याची मैत्री झाली. त्या मैत्रीचे रुपांतर पुढे विवाहात झाले. कार्मेन सांगते, ''झुबिन म्युझिक ग्रुपमध्ये सर्वांत पुढे असायचा. तो सर्वांचा नेता होता. कोणते ही संगीत महोत्सव सोडायचे नाहीत हे तो बरोबर जाणायचा.'' झुबिनने मात्र आपल्या संगीत क्षेत्रात यशाचे श्रेय आपले गुरू ओट्टोन्हम यांना दिले आहे.'' ''ओट्टोमुळेच मी 'कानसेन' झालो. त्यांनीच मला आवाज व नाद यातील फरक शिकवला'' असे त्याने नमूद केले आहे. झुबिनला संगीत दिग्दर्शनाची खरी दीक्षा हॅन्स स्वेस्रोक यांनी दिली. त्यांनी मेहली मेहताना स्पष्टच सांगितले, ''खरोखरच तुमच्या मुलाला आणखी काही शिकविण्याचे माझ्याजवळ काहीही शिल्लक राहिलेले नाही. त्याला आता सर्व काही माहीत झाले आहे.''

### परदेशात

''रॉयल लिव्हरपूल फिल हार्मोनिक'' या संस्थेने संगीत दिग्दर्शनासाठी एक स्पर्धा जाहीर केली होती. त्यात भाग घेऊन झुबिन विजयी झाला. बारा हजार रुपयांचे बक्षीस पटकावून, गरोदर असलेल्या कार्मेनला घेऊन झुबिन लिव्हरपूरला स्थायिक होण्यासाठी म्हणून आला. पण त्यांना तिथे इंग्लंडमधल्या वर्णद्वेषाचा फटका सहन करावा लागला. इथेच मुलगी झरीनाचा जन्म झाला. जीवन खडतर

व्हायला लागले. त्याच काळात 'कॅनेडियन ब्रॉडकास्टिंग कॉर्पोरेशन'ने मासिक पाच हजार रुपयांच्या मानधनावर कॅनेडियन रेडियोवर काम करण्यासाठी झुबिनला आमंत्रित केले. पण इंग्लंडपासून कॅनडापर्यंत जाण्यासाठी विमानतिकिटे खरेदी करायला त्याच्याजवळ पैसे नव्हते. वडिलांच्या सूचनेवरून झुबिनने त्यावेळचे भारताचे राजदूत श्रीमती विजयालक्ष्मी पंडित यांची भेट घेतली व त्यांना आपली कहाणी सांगितली. लाल फीत गुंडाळून ठेवून विजयालक्ष्मी पंडितांनी झुबिनला भारत सरकारतर्फे सर्व मदत मिळवून दिली. सिंगफ्रिड हर्स्ट या मित्राच्या मध्यस्थीने फ्रॅडरिक मान या दानशूर उद्योगपतींशी झुबिनची ओळख झाली. त्यांच्यामुळे ''न्यूयॉर्क फिलहार्मोनिक''साठी त्या उन्हाळ्यात काम करण्याची संधी झुबिनला मिळाली. याच दरम्यान त्याचा मुलगा मेहेरखान याचा जन्म झाला. बायको व मुलांना सासुरवाडीला पाठवून झुबिनने अमेरिकेचा रस्ता धरला. फिलाडेल्फियातील त्याचे वास्तव्य मात्र सुखाचे झाले. रसिक व समीक्षकांनी मुक्तकंठाने झुबिनच्या संगीत दिग्दर्शनाची स्तुती केली. 'म्युझिकल अमेरिका' या नियतकालिकाच्या समीक्षकाने नोंद केली आहे, ''या तरुण संगीत दिग्दर्शकाने कमाल करून दाखवली! रसिकांनो जागे रहा! संगीत दिग्दर्शनातील उगवता तारा तुमच्या भेटीला येत आहे.'' ''बुलेटिन'' या मान्यवर पत्राचे संगीत समीक्षक 'मॅक्स द शैरांसि' यांनी ग्वाही दिली, ''झुबिनची ऑर्केस्ट्रावरील पकड कमालीची मजबूत आहे. त्याची सौंदर्य स्थळांची पेरणी अतिशय मार्मिक अशी आहे. त्यांचे संगीत जीवंत व टवटवीत असे आहे. त्यांच्या प्रतिभेपुढे आकाश ठेंगणे आहे.''

**जगन्मान्यता**

कार्मेन व मुले झरीना व मेहेरबान यांना भेटण्यासाठी मॉंट्रियलला आल्यावेळी झुबिनला तिथल्या 'मॉट्रियल ऑर्केस्ट्रा'ने १९६१-१९६२ या मोसमाला संगीत दिग्दर्शनासाठी करारबद्ध केले. अशाप्रकारे वयाच्या अवघ्या चोवीसाव्या वर्षी झुबिन मॉंट्रियल सिंफनी ऑर्केस्ट्राचे संगीत दिग्दर्शक झाले. ''आकाशात जेव्हा धूमकेतू उगवतो तेव्हा लोकांना त्यांची दखल घ्या म्हणून सांगावे लागत नाही'' असे मॉंट्रियल ऑर्केस्ट्राचे मॅनेजर वीक यांनी जाहीर केले होते. त्यानंतर मात्र झुबिनने मागे वळून पाहिले नाही. त्यांची सतत आगेकूच होत राहिली. पुढे त्यांना

'लॉज एंजेलिस फिलम्हार्मोनिक'तर्फे संगीत दिग्दर्शनाची संधी मिळाली. तिथे त्यांची श्रीमती रेमंड चेंडलर या धनिक व रसिक बाईशी ओळख झाली. श्रीमती चेंडलर या प्रतिष्ठित अशा 'लॉस एंजेलिस टाईम्स'च्या प्रकाशिका होत्या. तसेच 'हॉलिवूड बॉल असोसियेशन'च्या अध्यक्ष व 'सदर्न कॅलिफॉर्निया सिंफनी असोसिएशनच्या'च्या कार्यकारी उपाध्यक्ष होत्या. चेंडलरबाईंची घनिष्ठ मैत्री झुबिनला उपकारक ठरली. त्यांच्यामुळे झुबिनचे नाव अमेरिकेत घरोघरी पोचले. विविध क्षेत्रातील अनेक नामवंतांशी त्यांची ओळख झाली. झुबिनच्या दिलखुलास व जीवनप्रिय तत्त्वज्ञान व शालीन वागणुकीमुळे "झुबिबेबि" हे टोपण नाव त्यांना मिळाले. अमेरिकेतील सर्व वर्तमानपत्रे, साप्ताहिके, पाक्षिके व मासिकांतून झुबिनवर गौरवपर लिहिले जावू लागले. जगप्रसिद्ध 'टाईम' साप्ताहिकाच्या मुखपृष्ठावर झळकण्याचा दुर्मिळ मान झुबिनला लाभला. भारत सरकारने 'पद्मभूषण' हा मानाचा किताब त्यांना बहाल केला. इटालीने 'कॅमॅदोतोर' हा प्रतिष्ठेचा किताब अर्पण केला. जगभरातील सहा विश्वविद्यालयांनी झुबिनला सन्माननीय पदव्या बहाल केलेल्या आहेत. "जगातील सर्वश्रेष्ठ संगीत दिग्दर्शक तोस्कानिनी वारले तेव्हा त्यांच्या निधनाने निर्माण झालेली पोकळी कधीच भरून येणार नाही असे वाटले होते. पण झुबिन मेहतांच्या रूपाने तोस्कनिनिचा वारस आम्हाला मिळाला" असे यथार्थ गौरवोद्गार "बॉस्टन सिंफनी"चे संगीत दिग्दर्शक चार्लस मंच यांनी काढले.

### घटस्फोट

झुबिन संगीताच्या महासागरात डुबी मारून मनसोक्त आनंद लुटत असताना त्याच्या वैयक्तिक जीवनात मात्र विसंवादी सूर उमटू लागले. झुबिन व कार्मेन यांच्या भेटीगाठी फारच कमी होऊ लागल्या. कार्मेनने नमूद केले आहे, "आम्ही जसे वाऱ्यावर भटकत एकमेकांच्या जवळ आलो तसेच भरकटतच एकमेकांपासून दूरदूर होत गेलो. आता घटस्फोटाशिवाय पर्याय उरलेला नाही." घटस्फोटानंतर झुबिन मेहतांचे नाव एक 'रोमँटिक प्लेबॉय' म्हणून बरेच दिवस गाजले. प्रख्यात गायिका तेरेसा स्ट्रेट्रस हिच्याशी त्यांचे नाव जोडण्यात येऊ लागले. पण झुबिनने त्याचा इन्कार केला आहे. "आम्ही दोघेजण महत्त्वाकांक्षी व आपापल्या क्षेत्रात

गुंतून गेलेले कलाकार होतो. आम्हा दोघांत शारीरिक वा भावनात्मक गुंता नव्हता. आम्ही दोघेही चांगले मित्र होतो हे मात्र खरे आहे.''

## दुसरा विवाह

प्रसिद्ध सिने निर्माते व्हिन्सेंट मिनेली हंच यांनी दिलेल्या मेजवानीच्या प्रसंगी नान्सिकोवाक या नटीशी झुबिनचा परिचय झाला. १९६९ साली दोघेजण ख्रिश्चन व पारशी संप्रदायाप्रमाणे विवाहबद्ध झाले. प्रारंभी नान्सीची अभिनय सोडण्याची तयारी नव्हती. अखेर झुबिनच्या मनधरणीचा उपयोग झाला व नान्सीन अभिनय क्षेत्रातून आपली निवृत्ती जाहीर केली. नान्सी भारतीय पद्धतीने पोशाख करायला लागली. भारतीय खाद्यपदार्थ तसेच पारशी लोकांची पक्वान्ने बनविण्यात नान्सी पटाईत झाली. शिवाय न्यूयॉर्क येथे स्वतंत्ररित्या 'रियल इस्टेट'चा व्यवसाय ही तिने केला. आश्चर्याची गोष्ट म्हणजे झुबिनच्या पहिल्या पत्नीने त्याचा धाकटा भाऊ झरिन याच्याबरोबर विवाह केला व ते उभयतां कॅनडात स्थायिक झालेले आहेत. झुबिन व आई-वडील लॉसएंजल्समध्ये स्थायिक झाले आहेत. झुबिनच्या वडिलांनी अमेरिकन नागरिकत्व स्वीकारलेले आहे तरी आईने मात्र आपले व झुबिनने भारतीय नागरिकत्व सोडलेले नाही. एवढी वर्षे तुम्ही परदेशात राहात आहात मग तुम्ही भारतीय नागरिकत्व का सोडलेले नाही?'' या प्रश्नाला ''मला भारताएवढा प्रिय देश अन्य कुठलाच वाटत नाही. काही वर्षांपूर्वी मला स्विस सरकारने त्यांचे नागरिकत्व स्वीकारण्याचे व त्यांच्या देशात स्थायिक होण्याचे आमंत्रण दिले होते. पण ते मी दिलगिरीपूर्वक नाकारले. अमेरिकेतील बिन नागरिक म्हणून मी भरमसाठ करभरणा करीत आहे. त्यांचे नागरिकत्व स्वीकारल्यास मला भरपूर पैसे साठविता येतील; पण मला त्याचे आकर्षण नाही. भारताशी, विशेषत: मुंबईशी माझी नाळ तुटलेली नाही. मुंबईला मी अधूनमधून जातो तेव्हा पारशी, गुजराती भाषेतून आपसुकच बोलू लागतो. मुंबईतील साठ हजार पारशी माझे 'आप्रो झुबिन' (आमचा झुबिन) म्हणून दृढप्रेमाने स्वागत करतात. या प्रेमाला तोड नाही. खऱ्या अर्थाने मी भारत व मुंबई सोडलेली नाही.'' असे विचार झुबिनने मांडलेले आहेत.

झुबिनची मैत्रिण बीना रामाणी यांनी एक मजेदार किस्सा सांगितलेला आहे.

''एकदा आम्ही काही मित्र मंडळी लॉस एंजेल्समधील एका रेस्टॉरंटमध्ये जेवायला गेलो होतो. तेव्हा अचानक झुबिनने सर्व आचाऱ्यांना बाजूला सारून रेस्टॉरंटच्या स्वयंपाकघराचा ताबा आपल्याकडे घेतला. तेथील हॅंबुर्गर्स तव्यावर तळून खीमारोटीमध्ये त्यांचे रूपांतर करून घेऊन आला. मग आम्ही सर्वजण मनसोक्तपणे जेवलो.'' ज्या दिवशी भारताने क्रिकेटचा विश्वचषक जिंकल्याची बातमी कानी पडली, त्या दिवशी झुबिनने सजवलेला वाद्यवृंदाचा कार्यक्रम सर्वोत्कृष्ट होता असे खुद्द झुबिननेच सांगितलेले आहे.

## न्यूयॉर्क फिलहार्मोनिक

जानेवारी १९७६ मध्ये न्यूयॉर्क फिलहार्मोनिकचे अध्यक्ष - कार्लोस मोजेली यांनी संगीत दिग्दर्शनाची जबाबदारी स्वीकारण्यासाठी झुबिनला गळ घातली. तेव्हापासून सातत्याने त्याच्या कराराची मुदत वेळोवेळी वाढविण्यात आली. अशा दीर्घकाळपर्यंत करारबद्ध झालेले झुबिन मेहता हे एकमेव संगीत दिग्दर्शक न्यूयॉर्क फिलहार्मोनिक संस्थेमध्ये आहेत.

आजच्या घडीला पाश्चात्य संगीत दिग्दर्शकांचा झुबिन हा चक्रवर्ती आहे. देशोदेशी झुबिन चार्टर्ड विमाने भरून आपल्या १०० वादकांचा व दहा हजार किलो वजनांचे वाद्यवृंदाचे सर्व सामान बरोबर घेऊन जातो. भारतात मुंबई, दिल्ली, कलकत्ता येथे त्यांचे वारंवार कार्यक्रम झालेले आहेत. ''तुमच्या यशाचे रहस्य काय?'' या प्रश्नाला झुबिनचे उत्तर, ''माझ्या कामातील लगन व दररोजची पंधरा-सोळा तासांची सक्त मेहनत. एक कार्यक्रम संपवून घरी परतलो की, पुढील आठवड्यातील कार्यक्रमाच्या तयारीला लागावं लागतं. लोकांना वाटतं यश मिळविणं सोपं आहे. पण तसं नसतं''

## आठवणी

भारतातील पारशी समाजानं १९८४ साली आपली त्रिशताब्दी मोठ्या थाटात पार पाडली. तेव्हा पारशी पंचायतीने - जे. आर.डी. टाटा, नानी पालखीवाला. एस.पी. गोदरेज, फील्ड मार्शल माणेकशा, डी. जे. जसावाला व अन्य समाजधुरीणांबरोबरच झुबिन मेहतांचा पण सत्कार व गौरव केला. त्यांचा

शाळासोबती हादी किजिला बाश सांगतात, ''झुबिन स्वभावाने अत्यंत प्रेमळ आहे.'' तो आपल्या जुन्या मित्रांना विसरलेला नाही.

प्रसिद्ध व्हायोलिनवादक - इझाक स्टर्न सांगतात, ''अतिशय उदार मनाचा माणूस म्हणून मी झुबिनला मानतो. त्याच्याबरोबर काम करणे म्हणजे एक स्वप्नपूर्ती असते. प्रत्येक वादकाला तो योग्य न्याय देतो व ठराविक ठिकाणी त्या वादकाला आपले कसब दाखविण्याची संधी उपलब्ध करून देतो. मी निरनिराळ्या संगीत दिग्दर्शकांच्याबरोबर काम केलेले आहे. पण झुबिनसारखा आनंद अन्य संगीत दिग्दर्शकांबरोबर काम करताना मिळत नाही.''

झुबिनकडे नुसतीच तंत्रशुद्धता आहे असे नव्हे तर त्याचं त्याच्या बंदिशीवर प्रभुत्व असते. आपल्या संगीत आराधनेत कमालीची तन्मयता ते भरतात. आपल्या १०० साथीदारांना संपूर्ण वाद्यवृंदासह वर उचलून नेण्याचे सामर्थ्य त्यांच्यात आहे. त्यांच्यापुढे प्रेरणा, कल्पकता यांचा सुरेख संगम हात जोडून उभा राहतो. माणुसकीचा हळूवार स्पर्श, तरल संवेदना, स्वरांची व नादांची मधुर किणकिण यांचा परिपाक म्हणजे त्यांची पाश्चात्त्य शास्त्रीय संगीताची मैफल! पुंगीवाल्यापुढे डोलणाऱ्या नागासारखे त्यांचे दर्दी रसिक श्रोते त्यांची मैफल ऐकताना डोलत असतात. हजारोंच्या संख्येने बसलेल्या श्रोतृवृंदाचा श्वाससुद्धा ऐकू येत नाही. शेवटी जेव्हा टाळ्यांचा प्रचंड कडकडाट होतो, तेव्हाच मैफल संपल्याची जाणीव सर्वांना होते. झुबिनच्या पुढील कार्यक्रमाला उपस्थित राहण्याचा मनोमन निश्चय करीतच, सर्वजण भारावलेल्या नादब्रह्माच्या पाशातून बाहेर पडून घरोघरी परततात.



# अमृतगान कोकिळा – लता मंगेशकर

''भारत लता मंगेशकरच्या गळ्याने गात आहे'' असे एक विधान वाचनात आले व मन थक्क झाले. लतादीदींना 'भारतरत्न' पुरस्कार मिळाल्यावर एका श्रेष्ठ समीक्षकाने वरील भाष्य केले होते.

गोव्याने महाराष्ट्राला व भारताला संगीत क्षेत्रात जी माणसे दिली त्यात मंगेशकर कुटुंबीय आघाडीवर आहे. मंगेशकर कुटुंबात लता ही वयाने सर्वांत ज्येष्ठ व पराक्रमाने श्रेष्ठ अशी व्यक्ती आहे. जितेंद्र अभिषेकी, प्रभाकर कारेकर, अंजना लोलेकर, मोगूबाई कुर्डीकर, किशोरी आमोणकर, ज्योत्स्ना भोळे, श्रीपाद नेवरेकर, अजित कडकडे अशी कितीतरी नावे सांगता येतील. मास्टर दीनानाथ आशा भोसले, उषा व मीना मंगेशकर, हृदयनाथ मंगेशकर या भावंडांनीसुद्धा संगीत क्षेत्रात आपापला निराळा असा ठसा उमटवून ठेवलेला आहे.

लग्न समारंभात जशी सनई हवी तसेच मराठी–कोकणी लोकांच्या लग्न समारंभाची सांगता लताने गायिलेल्या अमर गीताने – '' जा मुली जा, दिल्या घरी तू सुखी रहा'' होते. नववधूची मग साश्रुनयनांनी सासरी पाठवणी होते. कण्वमुनींनी आपली मानस कन्या शकुंतला हिची दुष्यंतराजाच्या घरी पाठवणी करताना काढलेले उद्गार प्रसिद्ध आहेत, ''ज्या मुलीला मी जन्म दिला नाही,

पण पालनपोषण मात्र केले. तिची पाठवण करताना जर मला एवढे दु:ख होते. तर स्वत:च्या पोटच्या गोळ्याला दुसऱ्या घरी पाठवताना आई-वडिलांना काय वाटत असेल याची कल्पनाच करता येत नाही.'' आणि म्हणूनच ''गंगा-जमुना डोळ्यात उभ्या का'' हे गाणे ऐकताना कोणत्याही संवेदनशील माणसाचा ऊर भरून आल्याशिवाय राहात नाही.

**स्वरलता**

स्वरलता, स्वरसाम्राज्ञी, स्वरसुंदरी, गानसाम्राज्ञी, संगीत क्षेत्रातील कलावंत, विसाव्या शतकातील चमत्कार, अशा नानाविध विशेषणांनी अलंकृत व्यक्ती म्हणजे लता दीनानाथ मंगेशकर! संगीत क्षेत्रामध्ये भारतातील व जगातील कोणत्याही व्यक्तीला त्यांच्या एवढी अपरंपार कीर्ती, मानसन्मान, पैसा, यश अन्य कुणालाही लाभलेले नाही. गेल्या अनेक दशकांपासून त्या आपले अढळपद टिकवून आहेत. त्यांच्यासमोर तुल्यबळ असा प्रतिस्पर्धी अजूनपर्यंत तरी उभा राहिलेला नाही.

**जन्म**

मराठी रंगभूमीवर स्त्री भूमिका करणारे चतुरस्त्र नट मास्टर दीनानाथ व माईंची लता ही सर्वांत थोरली मुलगी. २८ सप्टेंबर १९२९ रोजी लताचा जन्म झाला. पित्याचे छत्र हरपले तेव्हा लता फक्त १३ वर्षांची किशोरी होती. त्यावेळी मंगेशकर कुटुंबाची आर्थिक परिस्थिती बेताचीच होती. मरणसमयी वडिलांनी लताला जवळ बोलावून कोपऱ्यात ठेवलेला तंबोरा व चीजांची वही दिली व सांगितले,'' बाळ! हेच तुझे धन आहे असे समज.'' वडिलांचा शेवटचा संदेश शिरोधार्थ मानून लताने कठोर गान-तपश्चर्या केली आणि स्वत:चे व त्याबरोबरच आपल्या वडिलांचे नावही अजरामर करून ठेवले. खऱ्या अर्थाने लताने आपल्या वडिलांचे ऋण फेडले व पितृधन लाखपटीने वाढविले. 'कल्पवृक्ष कन्येसाठी लावुनिया बाबा गेले' हे भावगीत जेव्हा कविवर्य पी. सावळाराम यांनी लिहिले आणि त्यांनी ते गीत लताला फोनवरून ऐकवले त्यावेळी लता दुसऱ्या बाजूने हुंदके देत रडू लागली. पी. सावळाराम यांनी सांगितलेली ही आठवण हृदयस्पर्शी अशी आहे.

## धडपडीचे दिवस

वयाच्या पाचव्या वर्षापासून मास्टर दीनानाथांनी लताला संगीत शिकवायला प्रारंभ केला. 'गवयाचे पोर सुरात रडते' अशी एक म्हण आहे. घरचं संगीतमय वातावरण, निसर्गाने दिलेला गोड गळा, व वडिलांकडून मिळालेले संगीत शिक्षण हेच लताचे बीज भांडवल होते. लहानपणी तिनें विविध नाटकांतून छोट्या-मोठ्या भूमिका केलेल्या आहेत. ''मला लाभलेला आवाज मी दैवी देणगीच समजते. वयाच्या पाचव्या वर्षापासून ऐकलेली गाणी लक्षात ठेवून मी गात असे. वडिलांनी एकदा ते ऐकले व माझे संगीत शिक्षण सुरू झाले.'' अशी आठवण लतानेच सांगितली आहे. ''मी ९ वर्षांची असताना सोलापूरला माझी पहिली जाहीर मैफल झाली. मी एक राग व दोन नाट्यगीते गायले व नंतर वडिलांच्या समवेत गायले. अजूनही मी रोज रियाज करते.'' असे त्या आवर्जून सांगतात. ''पहिली मंगळागौर' या चित्रपटात लताने बालनटी म्हणून काम केले आहे. पण त्यांना त्यांची भूमिका असलेले चित्रपट पहायला मात्र आवडत नाही.

१९४१ साली 'खजांची' चित्रपटाच्या स्पर्धेत लता मंगेशकरना प्रथम पारितोषिक मिळाले व पार्श्वगायनाच्या क्षेत्रात त्यांचा प्रवेश झाला. मास्टर विनायकांच्या चित्रपटातून लताने लहान-सहान भूमिका वठविल्या. गुलाम हैदर यांनी पंजाबात नेऊन चित्रपटात भूमिका दिल्यामुळे तिचा बोलबाला झाला (१९४८). तेव्हापासून लताच्या लोकप्रियतेचा आलेख सतत चढत्या श्रेणीत आहे. सर्वश्रेष्ठ पार्श्वगायिका म्हणून जे लताने अढळपद प्राप्त केले ते आजतागायत कायम ठेवलेले आहे. भारतातील व जगातील जवळजवळ सर्व भाषांमधून त्यांनी गाणी गायिलेली आहेत. आजपर्यंत २५हून अधिक भाषांत ५० हजारांच्यावर गाणी लताने गायिलेली आहेत. वेगवेगळ्या भाषेतल्या तीन हजारांच्यावर चित्रपटांना त्यांचे पार्श्वगायन लाभलेले आहे. देश-विदेशातील असंख्य गानरसिकांना त्यांनी तृप्त करून सोडलेले आहे.

## छंद

पद्धतशीरपणे लताचे शालेय शिक्षण झालेले नाही तरी त्यांनी आपल्या जिद्दीने एक अद्‌भुत असा चमत्कार करून दाखविला आहे. हे करीत असताना जीवनात

आलेले भले-बुरे अनुभव, निंदा-स्तुती, त्यांनी एखाद्या योगिनीच्या तटस्थतेने स्वीकारले आहेत. त्यांचे मराठी, हिंदी, इंग्रजी पुस्तकांचं वाचन सतत चालू असतं. त्या क्रिकेटच्या शौकीन पण आहेत. अमेरिकेतील प्रशस्त बगीचे त्यांना फार आवडतात. परदेशांपैकी स्वित्झर्लंड देश त्यांना खूप आवडतो. पण ते सगळं फक्त थोडेच दिवस. बाकी भारतातच त्यांना फार बरे वाटते. कारण इथं आपलं स्वत:चं वातावरण असतं. ''मुंबई आता पूर्वीची राहिलेली नाही, हे खरंच आहे. तरी मुंबई मला आवडते यात संशय नाही'' असे त्या सांगत असतात. फोटोग्राफीचा छंद त्यांनी जपलेला आहे. पण आता कुठेही बाहेर जाऊन फोटो काढण्याची सोय राहिलेली नाही; कारण लगेच लोकांचा गराडा त्यांच्याभोवती पडतो.

''आमच्या लहानपणी आम्ही नाना चौकात राहत होतो. तेव्हा पद्मिनी कोल्हापुरेचे वडील पंढरीनाथ कोल्हापुरे यांच्याबरोबर रोज सकाळी चौपाटीवर फिरायला जात होतो. परत येताना 'कोना रेस्टॉरंट' मधून बटाटेवडे खाल्ल्याशिवाय माघारी येत नव्हतो. पण आता ते शक्यच नाही. गेल्या कित्येक दशकांत चौपाटीच्या वाळूत मी मनात असूनही उतरू शकलेले नाही. 'गेले ते दिन गेले' असे म्हणण्याशिवाय काहीच करता येत नाही'' अशी प्रांजळ खंत त्या बोलून दाखवतात.

### प्रसिद्धीची हाव नाही

प्रसिद्धीपासून लता मंगेशकर किती लांब राहतात त्याचे एक उदाहरण पुरेसे आहे. १९६९ मध्ये त्यांचे नाव 'गिनीज बुक ऑफ वर्ल्ड रेकॉर्डस्' या पुस्तकात आले होते. पार्श्वगायिका म्हणून फक्त लताचीच त्या पुस्तकात नोंद आहे. हा एक विक्रम आहे. त्यांच्या एका मैत्रिणीने ते पुस्तक भेट म्हणून लताला पाठवून दिले. त्यांनी ते वाचून, कुणालाही काहीही न सांगता कपाटात ठेवून दिले. पुढे १९७४ साली तब्बल पाच वर्षांनी लताच्या लंडनमधील कार्यक्रमाच्यावेळी त्या पुस्तकातील नोंद जगजाहीर झाली.

''आवाजासाठी तुम्ही कोणते पथ्य पाळता?'' या प्रश्नाला, ''आवाजासाठी म्हणून मी खास असं कुठलंच पथ्य पाळत नाही. पण मला 'सायनस'चा त्रास असल्यामुळे थंड पदार्थ मात्र घेत नाही.'' असे त्या सांगतात. कवी पी. सावळाराम,

गझलकार सुरेश भट, संगीत दिग्दर्शक वसंत प्रभू व नौशाद अली हे त्यांचे आवडते कवी व संगीतकार आहेत. महम्मद रफी, मुकेश, हेमंतकुमार, तलत महमूद हे त्यांचे आवडते गायक. शास्त्रीय संगीतात पंडित भीमसेन जोशी हे त्यांचे खास आवडीचे. पंडितजी बरोबर त्यांनी हिंदी भजने ध्वनिमुद्रित केली आहेत. 'आनंदघन' या टोपण नावाने त्यांनी एका चित्रपटाचे संगीत दिग्दर्शन पण केले आहे. या सर्व व्यापातून निवृत्त झाल्यावर आत्मचरित्र लिहिण्याचा त्यांचा मानस आहे. कुष्ठरोग्यांसाठी अविरत कार्य करणाऱ्या बाबा आमटे व त्यांच्या 'आनंदवन' ह्या प्रकल्पासाठी त्या सढळ हाताने मदत करीत असतात. तसेच जेव्हा परदेश दौऱ्यावर जातात तेव्हा तिथला एकतरी कार्यक्रम धर्मादाय कार्यासाठी देतात. राजकारणात त्यांना रस नाही. स्वातंत्र्यवीर सावरकर त्यांच्या घरी येत असत. एकदा त्यांनी तात्यांना "तुम्ही जे कार्य करता, ते समजून घेण्याची माझी इच्छा आहे." असे सांगितले तेव्हा सावरकर त्यांना म्हणाले, "तू या फंदात पडू नकोस. तुझे क्षेत्र निराळे आहे. राजकारणात घरादारावर पाणी सोडावं लागतं. तू घरातील थोरली मुलगी आहेस. तुझ्यावर मोठी जबाबदारी असल्यामुळे तू राजकारणात भाग घेवू नकोस." त्यांचं कळकळीचं मार्गदर्शन त्यांनी स्वीकारलं व त्या राजकारणापासून सतत दूर राहिल्या. "मागे वळून पाहताना मी घेतलेला निर्णय बरोबर होता असे वाटते." असं त्या सांगतात.

सदा शुभ्रधवल वेष हे त्यांचे खास वैशिष्ट्य. हाती तंबोरा घेऊन तिरूपती व्यंकटेश्वरापुढे किंवा गोव्यातील मंगेशापुढे बसून गानपूजा बांधणारी लता पाहिली की संत मीराबाईची आठवण येते. वीणावादिनी साक्षात् सरस्वतीच जणू! श्रीनिवास खळे यांच्या दिग्दर्शनाखाली निघालेली "वृक्षवल्ली आम्हा सोयरे वनचरे" इत्यादी गाणी त्यांनी किती उत्कटतेने गायिलेली आहेत! १९६२ आणि १९७१ला युद्धाच्याप्रसंगी प्रत्यक्ष युद्धभूमीवर जावून आपल्या शूर सैनिकांसाठी त्यांनी कार्यक्रम केलेले आहेत. 'ऐ मेरे वतन के लोगों' व 'सत्यमेव जयते' ही स्फूर्तीदायक गाणी म्हणून त्यांनी जवानांना उत्साहित केलेले आहे आणि भारताची नागरिक म्हणून आपले कर्तव्य अत्यंत निष्ठेने पार पाडले आहे.

भारत सरकारच्या फिल्म डिव्हिजनने त्यांच्या जीवनावर डॉक्युमेंटरी काढण्याच्या

संबंधाने कितीतरी वेळा त्यांची मनधरणी केली. पण त्या बाबत त्यांनी नकारच दिला. इंग्रजी चित्रपटांच्या व्हिडियो कॅसेट पाहायला त्यांना फार आवडतात. फिल्मी दुनियेत कुणाकडेही नसतील एवढा मोठा व्हिडिओ कॅसेटचा संग्रह लतादीदीकडे आहे. गमतीची गोष्ट म्हणजे जोरदार हाणामारीचे चित्रपट त्यांना अतिशय आवडतात व ते चित्रपट त्या पुन:पुन: पाहतात.

दिवस असो वा रात्र–रेडियो, टेपरेकॉर्डर, ध्वनिक्षेपक, दूरदर्शनवर लताचे गाणे ऐकायला आले नाही असा क्षण विरळाच! शिवाय लताने गायिलेल्या कोणत्यातरी गाण्याचे एकतरी कडवे लाखो लोक सतत गुणगुणत असतात. लताचा आवाज हा आमच्या सर्वांच्या जीवनाचा एक अविभाज्य असा भाग झालेला आहे.

लताने गायिलेली गाणी असंख्य आहेत. त्यातली कोणती गाजलेली आहेत असे विचारणे म्हणजे साखरेतील कोणता कण जास्त गोड आहे असे विचारल्यासारखे होईल. लतानेच एकदा आपली सहा गाणी (मराठी) निवडून त्याची यादी जाहीर केली होती –

१. गंगा जमुना डोळ्यांत उभ्या का?
   जा मुली जा, दिल्या घरी तू सुखी रहा....
२. चल नाच नाच रें, नंदकिशोरा
   सूर मुरलीचा घुमव जरा
३. सप्तपदी मी रोज चालते, तुझ्यासवे ते
   शतजन्मीचे हो माझे नाते....
४. जीवनात ही घडी अशीच राहू दे
   प्रीतीच्या फुलावरि, वसंत नाचू दे....
५. बाळा होऊ कशी उतराई
   तुझ्यामुळे मी झाली आई....
६. कल्पवृक्ष कन्येसाठी
   लावूनिया बाबा गेले....

मानसन्मान

जगातील सर्वश्रेष्ठ पार्श्वगायिका म्हणून लता मंगेशकरना कितीतरी पारितोषिके, बहुमान व पदव्या प्राप्त झालेले आहेत. गोल्डन, प्लॅटिनम ध्वनिमुद्रिका कितीवेळा मिळाल्या, याला गणनाच नाही. भारत सरकारने त्यांना 'भारतरत्न' हा सर्वोच्च नागरी किताब देऊन यथार्थ असा गौरव केला आहे.

मृत्यू व जीवनाबद्दलचे तत्त्वज्ञान त्यांनीच गायिलेल्या कविवर्य भा. रा. तांबे यांच्या एका अमर काव्यात व्यक्त झालेले आहे. ''जन पळभर म्हणतील हाय हाय, तू जाता राहील कार्य काय?'' वरील तत्त्वज्ञान हे सर्वसामान्य माणसांना लागू होणारे आहे. पण लता मंगेशकर मात्र आपल्या अमृत गानाने अमरच राहणार आहेत.



# सतारीचे जादूगार - पंडित रविशंकर

जागतिक पातळीवर भारतीय अभिजात संगीतला मानाचे स्थान मिळवून देणाऱ्यामध्ये प्रख्यात सतारवादक पंडित रविशंकर यांचा सिंहाचा वाटा आहे. पन्नालाल घोष यांनी बासरीला जे अलौकिक मोठेपण प्रदान केले, किंवा बिस्मिला खाँसाहेबांनी सनईला जी जगन्मान्यता मिळवून दिली तसेच मोठेपण पंडित रविशंकर यांनी सतारीला प्राप्त करून दिले आहे. प्रसन्न व्यक्तिमत्त्वाचे, ऋजू वृत्तीचे, व सर्वांबद्दल आपुलकी दाखवणारे पं. रविशंकर एक व्यक्ती म्हणूनही सर्वप्रिय आहेत.

**जन्म**

रविशंकर यांचा जन्म ७ एप्रिल १९२० रोजी बनारस येथे एका सुविद्य बंगाली ब्राह्मण कुटुंबात झाला. त्यांचे मूळ गांव जेसोरने आता बांगला देशात आहे. त्यांच्या वडिलांचे नाव प्राध्यापक रामशंकर. अमेरिकेतल्या कॅलिफॉर्निया विद्यापीठात ते प्राध्यापक होते. तिथे ते तत्त्वज्ञान हा विषय शिकवीत. संगीत त्यांच्या घरातच होते. झालाबाड या संस्थानात कारभारी म्हणून काम करीत असताना त्यांच्या वडिलांनी लहानपणी एका घरंदाज बीनकाराकडून गायन-वादनाचे शिक्षण घेतले होते. तो वारसा रविशंकरांना मिळाला. त्यांचे वडील बंधू उदयशंकर नृत्यकलेत प्रवीण होते. त्यांच्या जोडीने रविशंकरही नृत्य करू लागले.

सोळाव्या वर्षीच ते नृत्यकलेत पारंगत झाले. उदयशंकरच्या नृत्यपथकात ते वयाच्या दहाव्या वर्षी दाखल झाले. त्या कलापथकामुळे त्यांना जगाची सफर घडली. उदयशंकर नृत्यपथकात असतानाच त्यांनी रंगमंच व्यवस्था, प्रकाश योजना, डिझायनिंग अशासारख्या गोष्टींचा बारकाईने अभ्यास केला.

### गुरू-शिष्याची अपूर्व जोडी

उदयशंकर यांच्या वाद्यवृंदाचे नियोजन, संचलन प्रख्यात सरोदवादक उस्ताद अल्लदीन खाँ (बाबा) करीत असत. रविशंकरांच्या सतार शिकण्याचा, त्यात भरीव प्रगती करून घेण्याच्या जिज्ञासू वृत्तीचे बाबांना फार कौतुक वाटले. नृत्यसंचात असताना त्यांचे रविशंकरवर पुत्रवत प्रेम जडले. त्यावेळी रविशंकरचे वय केवळ पंधरा वर्षांचे होते. त्यांच्या मातोश्रींनी बाबांना ''रविशंकरला सतार शिकवा'' अशी गळ घातली. अशाप्रकारे ते बाबांचे शिष्य झाले. सतार शिकण्यासाठी मग ते महिसरला (उ.प्र.) बाबाच्या घरीच राहू लागले. प्राचीन गुरू-शिष्य परंपरेतून त्यांचे सतारशिक्षण सुरू झाले. बाबाकडून त्यांनी कसदार अशी तालीम घेतली. रविशंकर बरोबरच बाबांचे चिरंजीव अली अकबर खाँ हे सरोदचे शिक्षण घेत होते. बाबांचे हे दोघेही शिष्योत्तम पुढे आपापल्या क्षेत्रात (सतार व सरोद) जगन्मान्य झाले. त्या दोघांनीही त्यांनी आपल्या गुरूचे नाव रोशन केले.

### पलायन

महिसरला रविशंकर सलग सात वर्षे राहिले. बाहेर अंगणात रस्सीच्या खाटेवर झोपावे लागे. रात्री विंचू, साप, उंदीर, डास, झुरळ इत्यादी प्राणी आजूबाजूला फिरत असत. त्यातच जवळच्या जंगलातून जोरदारपणे कोल्हेकुई सुरू होत असे. अल्लादीन खाँसाहेब कडक शिस्तीचे. थोरमोठ्या घरचा मुलगा म्हणून त्यांनी या विद्यार्थ्याला सैल सोडले नव्हते. त्या कडक शिस्तीला व कोल्हेकुईला कंटाळून, घरी परतण्यासाठी म्हणून एक दिवस सकाळीच ते आपले बोचके घेऊन स्टेशनकडे गेले. बाबांना जेव्हा हे समजले तेव्हा ते धावत स्टेशनवर गेले आणि वात्सल्याने रविशंकरची मनधरणी करून त्याला आपल्या घरी परत आणले. त्याची समजूत

घातली, 'बेटा, कष्टाशिवाय विद्या येत नाही.' त्या प्रसंगानंतर रविशंकरला राहण्यासाठी व झोपण्यासाठी म्हणून स्वतंत्र खोली देण्यात आली.

रविशंकरची सतार व अली अकबरची सरोद यांच्या संयुक्त वादनांचे कार्यक्रम जागोजागी व्हायला लागले. खाजगी कार्यक्रम, जलसे, मैफिली, जाहीर कार्यक्रम, आकाशवाणी संगीत कार्यक्रम, जिथे-तिथे त्यांची जुगलबंदी कार्यक्रम खूप गाजायला लागले. रविशंकर पुढे आकाशवाणी केंद्रावर वाद्यवृंदाचे संचालक झाले. दरम्यान त्यांनी सत्यजित राय यांच्या 'पथेरपांचाली' व 'अपराजितो' ह्या बंगाली चित्रपटांना सुसंवादी संगीत दिले.

### विवाह

प्रथम श्रेणीचे सतारवादक म्हणून रविशंकरचे नाव गाजायला लागले. त्यांच्या गुणांवर खूष होऊन अल्लाद्दीन खाँ साहेबांनी त्यांचा विवाह आपली मुलगी अन्नपूर्णादेवीशी लावून दिला व त्यांना जावई करून घेतले. त्यानंतर मेहुणे अली अकबर यांच्याबरोबर त्यांचे सतार-सरोद जुगलबंदीचे कार्यक्रम सर्वत्र व्हायला लागले व अतिशय लोकप्रिय झाले. त्यांना शुभेंद्रुशंकर (शुबो) हा मुलगा झाला.

### घटस्फोट

सतार घेऊन जगभर भ्रमंती करायला लागल्यावर लहानग्या शुबोला घेऊन अन्नपूर्णादेवी मुंबईत एकटीच रहायला लागली. शुबो एक चांगला चित्रकार होता. मुंबईतील जे.जे. स्कूल ऑफ आर्टमध्ये तो शिकला. रविशंकर सतत जगप्रवासात मग्न असत. त्यामुळे त्यांना आपल्या मुलाला शिष्य केलेच नाही. आईने त्याला घरीच सतारवादनाचे धडे दिले. पुढे पती-पत्नीमध्ये तंटे-बखेडे वाढत चालले. त्यांनी मग समझोत्याने घटस्फोट घेतला. शुबोला मात्र रविशंकरने पुढे अमेरिकेत बोलावून घेतले व त्याला आपल्या साथीदारांत समाविष्ट केले. आपल्या पत्नी-मुलांसह शुबो अमेरिकेतच ऑरेंज कौंटीमध्ये राहत होता. वयाच्या ५१ व्या वर्षी न्युमोनियाने शुबो मरण पावला. शुबोच्या निधनाने रविशंकरना धक्काच बसला. सतारीसह बसलेल्या शुबोचा फोटो तेव्हांपासून ते सतत जवळ बाळगत असतात.

### सुपर शोमन

राजकपूरला जसं चित्रपट सृष्टीतला शोमन म्हणून ओळखलं जाते, तसं मैफलीतला सुपर शोमन म्हणून पंडित रविशंकर यांना मानतात. सतारीचे वादन करताना आपल्या अमोघ सिद्धीचे प्रदर्शन ते करतातच, त्याचबरोबरीने त्यांची मैफल दर्शनीयसुद्धा असते. सुदैवाने त्यांना मोहक, बदामाच्या आकाराचा चेहरा लाभला आहे. रेशमी वस्त्रावर जसे वाळ्याचे सुगंधी पाणी शिंपडावे तसे आपल्या देखण्या चेहऱ्यावर सदैव गोड हास्य कायम तरळत ठेवण्याची जागरूकता पण त्यांच्यापाशी आहे. तारुण्याची लकाकी अनेकांशी असते पण रविशंकरच्या ठायी आरस्पानी संवादी असा अंगभूत रुबाब आहे. त्याचमुळे मैफलीत आल्या आल्याच ते टाळ्या घेतात. कलावंताने नुसते शोमन नव्हे तर 'सुपर शोमन' असायला हवे अशी धारणा राजकपूर सारखीच रविशंकरची पण असते. अशा गुणसंपदेच्या बळावरच त्यांनी यश व पैसा अपल्याकडे ओढून आणला आहे.

### भारताचा सांस्कृतिक राजदूत

१९५६ सालापासून रविशंकर यांनी आंतरराष्ट्रीय पातळीवर आपल्या मैफली सादर करायला प्रारंभ केला. वयाच्या १९ व्या वर्षी त्यांनी आकाशवाणीवर सतारीचे कार्यक्रम सादर करायला सुरुवात केली. त्याचवेळी ते नर्तक म्हणून प्रख्यात झाले होते. शिवाय-सरोद, शहनाई, सारंगी, व्हायोलिन, मुरली, वीणा, गिटार अशी वाद्ये वाजवण्यातही ते प्रवीण झाले होते. त्यामुळे दिल्ली आकाशवाणीवर विदेश सेवा विभागात भारतीय संगीतासाठी त्यांची नियुक्ती करण्यात आली होती. लहानपणी त्यांनी रामायण, महाभारत सारखी महाकाव्ये व बंगाली साहित्यातील प्रमुख साहित्य वाचले होते. उदयशंकरचा नृत्यसंच पॅरिसला असल्यावेळी त्यांनी फ्रेंच, स्पॅनिश, रशियन, व हंगेरियन संगीत व साहित्याचा अभ्यास केला. आपल्या सात दशकांच्या कारकीर्दीत रविशंकर यांनी अन्य कोणत्याही भारतीय कलाकारापेक्षा जास्त विदेश भ्रमण केलेले आहे. त्यामुळेच त्यांना 'भारताचा सांस्कृतिक राजदूत' अशी यथार्थ पदवी लाभली.

प्रख्यात पाश्चिमात्य व्हायॉलिनवादक यहुदी मेन्युहीन पंडित रविशंकर यांच्या सतारवादनाकडे आकृष्ट झाले व त्यांच्याकडून त्यांनी सतारवादनाचे धडे पण

गिरवले. त्यातूनच त्यांच्या मनाच्या तारा जुळल्या. मग त्यांनी रविशंकर बरोबर सतारीचे सहवादन करून - व्हायोलिन व सतारीची जुगलबंदी जगापुढे सादर केली. पॉप गायक हॅरिसन व अन्य काही जण रविशंकरचे शिष्य झाले. अनेक परदेशी कलाकारही त्यांच्याकडे सतार शिकण्यासाठी यायला लागले. त्यात अमेरिकनांची संख्या जास्त होती. ते पाहून रविशंकर यांनी अमेरिकेत 'किन्नर संगीत विद्यालय' सुरू करून सतार शिकवण्याची सोय उपलब्ध केली.

भारतीय अभिजात संगीत पाश्चिमात्य देशांत लोकप्रिय करीत असताना पंडित रविशंकर यांच्यावर 'भेसळींचा' आरोप करण्यात आला. पण त्यांनी आपले व्रत सोडले नाही. 'भारतीय संगीत हे अभिजात व अस्सल आहे म्हणूनच ते अनादि व अंनतही आहे.' असा त्यांचा विश्वास आहे. त्यांचे टीकाकार-कलाकार पण मग हळूहळू परदेशांत मैफली झडवू लागले. तेव्हा त्यांना समजले की, सूर, ताल, नाद व संगीताला कोणत्याही भौगोलिक मर्यादा नसतात.

### कठोर साधना

आपल्या गुरूगृही सात वर्षे राहून रविशंकर यांनी कठोर साधना केली होतीच. आता वयाच्या ८०व्या वर्षी सुद्धा ते पहाटे लवकर उठून अगोदर आध्यात्मिक व नंतर सतारीची तासन्तास साधना करतात. रोजचा रियाज व नवनवीन नाद निर्माण करण्यात ते किती तरी तास तन्मय होऊन जातात हे त्यांचे त्यांनाच कळत नाही. झटपट सतार शिकवा अशी गळ घालणाऱ्यांना ते शिकवायचे सरळ नाकारतात.

### गुरूकुलाचा ध्यास

लंडन शहर रविशंकर यांना प्रारंभी फार आवडत होते. तिथल्या हवेत एक 'प्यार'आहे असे ते म्हणत. पण तितकीच तिथली हवा व वातावरण पावसाळी, ढगाळ, व कुंद असते. त्यामुळे मग तगमग होते म्हणून त्यांनी लंडन सोडले व ते अमेरिकेत स्थायिक झाले. एकदा अमेरिकेतील चित्रपट क्षेत्रातील कलावंतांबरोबर ते कॅलिफोर्नियात भटकत होते. तेव्हा तिथला सूर्य, समुद्र, डोंगर, हिरवळ, पाने, फुलं, फळे, प्राणी इ. बघून ते व त्यांची द्वितीय पत्नी सुकन्या यांनी तिथेच घर घ्यायचे ठरविले. अल्याड डोंगर, पल्याड समुद्र, मध्ये उभा कडा आणि त्या

कड्यावर विसावलेली सुंदर बंगली. त्यांनी अडीच कोटी रुपयांना ती बंगली विकत घेतली व तिथेच आपला मुक्काम ठोकला. तिथल्या वास्तव्यातच त्यांनी 'माय म्युझिक, माय लाईफ' हे आत्मचरित्र लिहून काढलं व प्रकाशित केले.

आपण एक गुरूकुल काढावं व त्यात पटाईत शागिर्द तयार करावेत ही रविशंकर यांची महत्त्वाकांक्षा तशी फार जुनी आहे. १९६२ साली त्यांनी मुंबईत संगीताचं अद्ययावत शिक्षण देणारी शाळा काढली होती. तिचे नाव होते 'किन्नर'. नंतर तिचीच शाखा त्यांनी अमेरिकेत सॅनफ्रान्सिस्को येथे १९६७ साली उघडली. तिथल्या विद्यार्थ्यांना शिकविण्यासाठी म्हणून त्यांनी भारतातून अनेक तज्ज्ञ गायक नेले होते. त्यात महाराष्ट्रातून पंडित जितेंद्र अभिषेकी पण गेले होते. ''शिष्याला गुरू जीवनातील नेमक्या वळणावर भेटायला हवा असे ते सांगतात. बाबांसारखा विराट ज्ञानी गुरू आपणांस अगदी योग्य वयात भेटला म्हणूनच मी जीवनात यशस्वी झालो.'' असे ते कृतज्ञतापूर्वक नेहमीच सांगत असतात.

रविशंकर यांनी वाराणसीत गंगा किनारी गुरूकुल चालविण्याचा घाट घातला होता. पण तो प्रयत्न फलद्रूप झाला नाही. कारण वारणासी हे गांव आडबाजूचं होते. राज्यसभेचे नियुक्त सदस्य म्हणून त्यांना दिल्लीत बराच काळ राहण्याची संधी लाभली. तेव्हा दिल्लीतच गुरूकुल काढून उरलेलं आयुष्य तिथेच घालवावे असा त्यांचा विचार चालला होता. काही वर्षांपूर्वी त्यांच्यावर अमेरिकेत बायपास सर्जरी करण्यात आली. तेव्हापासून त्यांनी भारतात येऊन स्थिर होण्याची आकांक्षा मनी धरली आहे. ''माझी अवघी हयात भटकंती करण्यात संपली. माझी संवादी वाद्ये, चोपड्या, ध्वनिमुद्रिका, ध्वनिफिती व सगळं संदर्भ साहित्य आज जगातल्या वेगवेगळ्या अशा सहा शहरांत विखुरलेले आहे. ते विखुरलेले धन एकत्र करून एकाच गुरूकुलात आणून ठेवणं हे माझे या पुढील जीवनाचे उद्दिष्ट आहे. माझं संकल्पित गुरूकुल म्हणजे फक्त संगीताचा वर्ग नसेल तर संगीतासाठी आपले आयुष्य झोकून देऊ इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांना कृतार्थ दिशा दाखविणारा दीपस्तंभ असेल'' असे विचार त्यांनी हल्लीच जाहीर केले आहेत. दिल्लीत जागा मिळावी म्हणून सरकारी-दरबारी खटपट करायला सुरुवात केली आहे.

## गौरव मालिका

'ग्रॅमी' पासून ते 'मॅगसेसे ॲवॉर्ड' असे शेकडो गौरव व पुरस्कार सतारीचे जादूगार पंडित रविशंकर यांना लाभलेले आहेत. 'स्पिरिट ऑफ फ्रीडम' हा जागतिक दर्जाचा बहुमान त्यांना लाभलेला आहे. त्यापूर्वी एम.एस. सुब्बलक्ष्मी व यहुदी मेन्युहिनसारख्या श्रेष्ठ कलावंतांचीच या पुरस्कारासाठी निवड झाली होती. कलकत्ता विश्वविद्यालय, हार्वर्ड विद्यापीठ इ. विद्यापीठांनी त्यांना 'डॉक्टरेट' पदवी देवून यथोचित असा सन्मान केला आहे. 'संगीतातून पूर्व व पश्चिमेचा मानसिक समन्वय साधणाऱ्या साधकाला सविनय सलाम' असे प्रशस्तीपत्रक त्यांना हार्वर्ड विद्यापीठाने सुवर्णाक्षरांत लिहून प्रदान केले. भारत सरकारने 'भारतरत्न' हा सर्वोच्च किताब बहाल करून त्यांचा गौरव केला.

## दुसरा विवाह

लंडन येथे सुकन्या नावाची दहा वर्षांची मुलगी आपल्या आईवडिलांबरोबर रविशंकरांची सतार ऐकायला गेली होती. वेडीपिशी होऊनच ती त्या मैफलीतून घरी परतली. त्या दिवसापासून ती रविशंकरांच्या आसपास घुटमळू लागली. ''माझ्या हृदयाचा एक ठोका पंडितजींच्या पहिल्या मैफिलीच्या वेळीच चुकला होता. कळत नव्हतं. पण समजत होतं... मी रविजींच्या प्रेमात पडले होते.'' असे सुकन्याने पुढे नमूद केले आहे.

रविशंकरांचं संगीत क्षेत्राबाहेरचं खाजगी आयुष्य हर्ष व खेद यांनी गदगदलेलं आहे. गुरूकन्या व सहविद्यार्थिनी अन्नपूर्णा देवींबरोबरचा पहिला विवाह अपयशी ठरला होता. पुढे त्यांचे नाव अनेक महिलांशी जोडण्यात आले, पण त्यांनी दुसरा विवाह मात्र केला नव्हता. सुकन्या शिष्या होऊन त्यांच्या जीवनात आली. वाढत्या वयाबरोबर सुकन्या भावनिकदृष्ट्या रविशंकरांच्या अधिकच जवळ आली व दोघांनी गुपचूप 'गांधर्वविवाह' केला. वयाच्या २७ व्या वर्षी सुकन्याने अनुष्का या मुलीला जन्म दिला. त्यानंतर तब्बल पाच वर्षांनी उभयतांनी भारतात येवून वेदमंत्राच्या घोषात विवाह केला. विवाहाच्यावेळी त्या उभयतांत चक्क ३४ वर्षांचा फरक होता. छोटी अनुष्का आपल्या आईवडिलांच्या लग्नात झोकात वावरत होती. बंगाली घराला दाक्षिणात्य घरपण आले. उभयतांतील प्रेम व विश्वास

बकुळीच्या फुलासारखा मंद तरीही सुवासिक गंधाने झपाटून टाकलेला असा आहे. रविशंकरांचा सर्व कारभार जगभर मैफिली ठरवण्यापासून भावी गुरूकुल उभारणीपर्यंतची सर्व दगदग सुकन्याच करीत असते.

## चिंतन व नवरचना

पंडित रविशंकर यांची कीर्ती दिवसेंदिवस वाढत चालली होती. प्रयोगशील कलाकार म्हणून त्यांचे नाव होऊ लागले. सतारवादनात, गायकीबाजाचा परपरागत बाजाशी संयोग घडवून आणून स्वतंत्र अशी शैली त्यांनी निर्माण केली. भारतीय व पाश्चिमात्य संगीताचा मिलाप घडवून आणणाऱ्या संगीत रचना त्यांनी तयार केल्या. त्याच प्रयत्नांतून 'ईस्ट मीटस वेस्ट' या ध्वनिमुद्रिका तयार झाल्या. त्यामुळे भारतीय संगीत शिकण्यासाठी येणाऱ्यांच्या संख्येत भरपूर वाढ झाली. त्यांनी 'तिलक श्याम' व 'परमेश्वरी' असे दोन नवे राग निर्माण केले. एवढेच नव्हे तर 'नवरस' व 'घनश्याम' सारखे नवे प्रयोगही केले. झुबिन मेहता व येहुदी मेन्युहिन यांच्याबरोबर सहवादनही केले. तसेच अली अकबर खाँसाहेबांच्या बरोबर जुगलबंदीचे अनेक कार्यक्रम पार पाडले. 'पाथेर पांचाली', 'गोदान', 'अनुराधा' या चित्रपटांना अविस्मरणीय असे संगीतही दिले. तसेच एक चिरंजीव रचना पण पंडितजींनी केली. ती म्हणजे 'सारे जहाँसे अच्छा, हिंदोस्ता हमारा' या महाकवी इक्बालच्या अमर काव्यपंक्तींना संगीतबद्ध केले. राष्ट्रगीताएवढेच हे गीत भारतीयांना भावतं.

मुंबईतील शिवाजी पार्क मैदानावर कलावंतांचा 'जातीयवाद विरोधी' मेळावा भरला होता. तेव्हा रविशंकर यांनी जातीय सलोख्यासाठी आवाहन करून, आपल्या 'शांती' या रचनेचं ध्वनिमुद्रण तिथे वाजवलं होतं. त्यांनी आपल्या सततच्या रियाजाला चिंतनाची जोड दिल्यामुळेच ते नवनवीन प्रयोग व नवरचना करू शकले. ''मी पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर किंवा लोकसंगीत असा भेदभाव न करता, जिथून जे भावलं तिथून ते घेवून पुढे जात राहिलो. मला कर्नाटकी संगीतातील सर्व बुजुर्ग संगीतकारांचे गाणे व वादन ऐकण्याची संधी लाभली. तसेच पॅरिस येथील दीर्घ वास्तव्यात, अनेक जागतिक कीर्तीच्या कलावंतांचे गाणे व वादन ऐकण्याचे

भाग्य लाभले'' असे रविशंकर आपल्या प्रयोगशीलतेबाबत बोलताना सांगत असतात.

'नवरसांच्यापैकी सर्वच संगीतात पकडता येत नाहीत. उदा. रुद्र रस, भयानक रस, व बीभत्स रस हे संगीतबद्ध करणे कठीण असतं. त्याउलट, श्रृंगार रस, करुण रस, अद्‌भुत रस, शांति रस हे सोपे आहेत. शांती रसामुळे मनाला शांती व समाधान लाभते. भक्ती रस हा तांत्रिक दृष्ट्या नवरसांत सामावलेला नाही. पण शांती व करुण रसाचा तो मिलाप आहे व भगवंतापर्यंत पोचायला भक्तिरस मदत करतो.'' असे चिंतनात्मक विचार पंडितजींनी मांडलेले आहेत.

''आजच्या विद्यार्थ्यांना लवकरात लवकर संगीत शिकून, संगीतकार म्हणून मिरविण्याची घाई लागलेली असते. मंद अग्नीवर शिजवलेले अन्न व मायक्रोवेव्ह शेगडीवर शिजवलेले अन्न यांच्या चवीत बराच फरक असतो, हे त्यांना कळत नाही. तंत्रशास्त्रामध्ये आजची युवापिढी, मागील पिढीपेक्षा नि:संशयपणे पुढे आहे आणि ती आनंदाची गोष्ट आहे. पण युवापिढीमध्ये दीर्घपल्ल्याची शिक्षण घेण्याची कुवत व संगीतात स्वत:ला बुडवून घेण्याची वृत्ती, कमी प्रमाणात दिसते. फक्त स्वर, राग, व ताल म्हणजे महान संगीत होऊ शकत नाही. संगीत हृदयाला भिडायला हवं. त्यातून अध्यात्मिक समाधान लाभायला हवं.'' असं रविशंकरांचं प्रतिपादन आहे.

### आठवणी

आपल्या प्रदीर्घ आयुष्याबाबत रविशंकर यांच्याकडे सांगण्यासारख्या अनेक आठवणी आहेत. त्यांनी 'घनश्याम' नावाची भव्य नृत्यनाटिका तयार केली होती. भव्य देखावे, आणि कथक, भरतनाट्यम व कथकल्ली या तीनही प्राचीन भारतीय नृत्यप्रकारांचा त्यांनी त्यात समावेश केला होता. ''हा प्रयोग फारच यशस्वी झाला व मनाला अपार आनंद देऊन गेला.'' असे ते सांगतात.

एकदा रविशंकर त्यांची पत्नी सुकन्या व सहकारी लंडनहून भारतात येताना तिथल्या विमानतळावरील कस्टम अधिकाऱ्यांनी त्यांना रोखलं. त्यांच्याकडे मोठाली खोकी होती. ''तुम्ही सारेजण इकडे या, आम्हाला ही सारी खोकी

तपासायची आहेत'' असे त्यांना सांगण्यात आलं.'' ''यात तर केवळ सतारी, तबले व इतर संगीताची उपकरणे आहेत.'' असे सुकन्याने सांगण्याचा प्रयत्न केला.पण ते अधिकारी काही ऐकायला तयार नव्हते. सुकन्या व त्या अधिकाऱ्यांचा वादविवाद जोरात चालला तेव्हा रविशंकर लांब जावू लागले. 'नो मिस्टर! तुम्ही इथून जावू शकत नाही.'' असं सांगून त्यांना अडवण्यात आलं. आता या संकटातून कसं बाहेर पडायचं असा विचार करीत रविशंकर उभे होते. तेवढ्यात आणखी काही कस्टम अधिकारी त्यांच्यापुढे येऊन उभे राहिले. सर्वांनी खिशातून डायऱ्या काढल्या व रविशंकरांची स्वाक्षरी मागितली, त्यांच्याबरोबर फोटो काढून घेतले व मग हसतहसत निघून गेले. गंभीर नाट्याचे, विनोदी नाट्यात रुपांतर झाले होते. सर्वांना जाण्याची अनुमती देऊन कस्टमचे ते अधिकारी निघून गेले तंग वातावरण सैल झाले.

आज भारतीय संगीताला जगभर जो सन्मान प्राप्त झाला आहे त्याचे श्रेय प्रामुख्याने पंडित रविशंकर यांच्याकडे जाते. खऱ्या अर्थाने ते 'भारतरत्न' आहेत.



# स्वतंत्र प्रज्ञेची गायिका : किशोरी आमोणकर

संगीतातील भारतीय प्रतिनिधी म्हणून प्रख्यात गायिका किशोरी आमोणकर यांना भारत सरकारने अमेरिका व फ्रान्स या देशांत १९८५ साली पाठविले होते. हा त्यांचा त्यावेळपर्यंतच्या कार्याचा तो यथोचित असा गौरवच होता. पाठोपाठ संगीत नाटक अकादमीने त्यांना आपला पुरस्कार देऊन आणखी एक मानाचा तुरा त्यांच्या शिरपेचात खोवला होता. ते पाहून जगभर पसरलेल्या त्यांच्या हजारो रसिक श्रोत्यांना मनापासून आनंद झाला होता. किशोरीताईने अमेरिकेत आपल्या गायनाने तिथल्या श्रोतृवृंदावर चांगलाच प्रभाव पाडला होता. त्यावेळच्या तिथल्या समीक्षकांनी लिहिलेल्या अनेक लेखांवरून ते स्पष्टपणे दिसून येते. ''प्रिन्सेस ऑफ ख्याल गायकी'' (ख्याल गायकीची राजकुमारी) हे बिरूद त्यांना तिथेच प्राप्त झाले. तिथल्या सामान्य व असामान्य अशा नागरिकांना त्यांचे गाणे भावले होते. श्रोत्यांच्या अंत:करणापर्यंत त्यांचे गाणे जावून भिडलेले होते. रसिक श्रोत्यांना त्या एका निराळ्याच विश्वात घेऊन जातात आणि खास अशा आपल्या आमोणकरी शैलीत गाऊन त्यांना उंच अशा स्वरांगणात नेऊन बसवतात. जयपूर घराण्याच्या गायकीतील वेगळेपणाच्या निर्मितीसाठी किशोरी आमोणकर सुप्रसिद्ध आहेत. त्यांच्या गाण्यात वेगळेपणा तर आहेच, पण एक निराळी अशी जान आहे. भावना ओतून त्या स्वर निर्मिती करतात. ताईचे गाणे त्यांच्या

व्यक्तिमत्त्वाप्रमाणे मनस्वी असे आहे.

### गायकीतील आगळेपणा

भारताच्या पंतप्रधान इंदिरा गांधी यांची क्रूर हत्या झाल्यानंतर, राष्ट्रीय शोक पाळताना दूरदर्शनवर नामवंत गायक, गायिकांनी इंदिराजींना स्वरांजली अर्पण केली होती. त्यावेळी ताईनी ज्ञानेश्वरीतील अत्यंत समयोचित असा 'जाणे अज मी अजर' येथून सुरू करून केदारचा उदात्त, गंभीर स्वरराज चढवून प्रेक्षक श्रोत्यांना एका अनन्य साधारण अशा आध्यात्मिक वातावरणात नेऊन सोडलं होतं. किशोरीताईंची संगीत व अध्यात्मिक तपश्चर्या त्या ओव्यांशी निगडीत होती आणि त्यांच्या स्वररचनेत ती एकवटून साकार झाली होती. अशी खाशी निवड सुचणं व ती योग्य अशा स्वरभावात भिजवून गाणं हा एक प्रकारचा पराक्रम होता. अशा प्रकारचा पराक्रम त्यांनी वेळोवेळी आपल्या मैफलीतून केला आहे.

पहिल्या षड्जाबरोबरच श्रोत्यांच्या चित्तवृत्ती आकर्षून घेणारा, ताईंना लाभलेला स्वर ही त्यांना लाभलेली ईश्वरी देणगी आहे. वयाच्या दहाव्या वर्षी कर्नाटकातील हुबळी येथील एका कार्यक्रमात सुप्रसिद्ध गायिका 'गानतपस्विनी मोगुबाई कुर्डीकर' (त्यांच्या मातोश्री) यांच्या कार्यक्रमात किशोरींच्या पूर्ण विकसित स्वरांचा साक्षात्कार झाला होता. स्वर कानी पडताच, त्याचं अलौकिकत्व मैफलीला तर जाणवलंच, पण त्यांच्या आईलाही ते जाणवलं. गर्भात असताना आपल्या आईला मिळणारी हैदर खाँसाहेब यांची तालीम जणू ताईंनी पाठ केली होती असं वाटतं! जसे चक्रव्यूह फोडण्याचे तंत्र श्रीकृष्णाने आपली बहीण सुभद्रेला सांगताना तिच्या गर्भात असलेला अभिमन्यू हुंकारत होता. किशोरीताईचा पिंडच जणु स्वरांच्यावरच परिपुष्ट झाला आहे. त्या गातात तेव्हा रागाच्या चलनवलनाबरोबर प्रत्येक स्वराला संदर्भ प्राप्त होतो आणि त्यामधून स्वरभावाची निर्मिती होते. दोन श्रुतींमधल्या कणांना स्पर्शून जेव्हा त्यांचा स्वर ये-जा करतो तेव्हा ते कणही प्रकाशित होतात. या सर्वांमधून स्वरभाव विलासिनी, आनंददायी अशी स्वरनिर्मिती करते.

### संगीत आराधना

गानतपस्विनी मोगूबाई कुर्डीकर यांनी आपल्या किशोरीला संगीताचं बाळकडू

पाजलं हे सर्वांनाच माहीत आहे. हुस्नलाल हे सिनेसंगीतातील एक श्रेष्ठ कलावंत. ते त्यांचे पहिले गुरू. उस्ताद अन्वर हुसेन यांच्याकडे पण त्यांनी तालीम घेतलेली आहे. ताई खरं म्हणजे डॉक्टर व्हायच्या विचारात होत्या. पण आईने त्यांना त्यापासून परावृत्त करून संगीत क्षेत्रातच रहायला सांगितले. किरकोळ शरीरयष्टीच्या ताई, अध्यात्माच्या जोरावर, आपल्या पंखावर कमालीच्या उंचीचं गाणं पेलतात, हे पाहून श्रोते थक्क होऊन जातात. परंपरागत संगीताचे संस्कार ग्रहण करीत असतानाच, स्वत:च्या स्वरमय व्यक्तिमत्त्वाचा शोध घेण्याची प्रक्रिया किशोरवयातच किशोरीताईच्या मनात सुरू होती. परंपरागत चौकटीत आपले मनस्वी गाणे मानवत नाही हे त्यांच्या लक्षात आल्याक्षणी स्वतंत्र प्रज्ञेच्या या गायिकेने ती चौकट बेदरकारकपणाने मोडून टाकली. अत्यंत काटेकोर व कर्मठ शिस्तीच्या घराण्याची तालीम मिळालेल्या या प्रतिभावान गायिकेने स्वत:च्या बुद्धीला आणि अंत:करणाला भावणारी स्वतंत्र गायकी धुंडाळून आपल्या गायकीला व्यासंगाची व प्रतिभेची जोड देऊन स्वतंत्र आणि तेजस्वी अशी 'आमोणकर शैली' निर्माण केली. ख्याल गायकीचा ठराविक असा जो साचा बनलेला होता, त्याचा त्यांना कंटाळा आला होता. तेच आलाप, तेच बोल, सगळीकडे त्याच त्याच बंदिशा यांच्यामुळे तोचतोपणा आला होता.

### स्वतंत्र शैली

किशोरीताईंनी विचारपूर्वक स्वत:च्या भावनांना रमविणारी स्वरांची निराळी वाट चोखाळली. त्यांचं गाणं भाववादी, रोमँटिक असं वाटतं. आपल्या स्वर अभिव्यक्तीसाठी जरूर पडली तेव्हा त्यांनी नव्या चिजा बनविल्या. त्या चिजांचा आशय व भावनाविष्कार हा किती एकजीव झालेला असतो, त्याचा प्रत्यय ताई त्या चीजा प्रत्यक्ष गात असतानाच ऐकणाऱ्यांना येतो. गझल त्या उत्तम प्रकारे गातात. त्यांचे उर्दू उच्चार तर कमालीचे लाजवाब! पण त्यांचा खरा जीव रमतो तो भक्ती संगीतात. टाळ मृदंगाचा ध्वनी ऐकताच काया-वाचा-मनाने त्या पुलकित होतात. त्यांचा आत्मा जणू आनंदात बहरून जातो. त्यानंतरच्या त्यांच्या स्वरांच्या माध्यमातून एका अवीट अशा आनंदाची मेजवानीच रसिकांना लाभते.

पंडित रत्नाकर पै यांनी आपले गुरू श्री. मोहनराव पालेकर यांची पुण्यतिथी साहित्य संघ मंदिराच्या पुरंदरे सभागृहात साजरी केली. तेव्हा स्वर्गीय पालेकर यांच्याकडे आपण पण स्वरसाधना केलेली आहे, म्हणून आपणही त्या कार्यक्रमात गावे असे ताईंना वाटले. सगळी मैफल आटोपल्यावर त्यांनी आपल्या स्वरांचे तबले आणायला लावून रात्री अडीच वाजेपर्यंत नवी मैफल मांडली. जयपूर शैलीने गायचे असा पक्का निश्चय करूनच ताईंनी 'मान न करिये गोरी' या चीजेपासून प्रारंभ केला व उपस्थितांच्या मनावर कायमचा असा ठसा उमटविला. त्याचप्रमाणे गोरेगावच्या म्युनिसिपल शाळेच्या प्रांगणात झालेली तिलक कामोद, केदार, नायकी, कानडा, गौड मल्हार व भैरवी ह्या चढत्या क्रमाने रंगत गेलेली मैफलही रसिकांच्या स्मरणात राहिलेली आहे. पुण्यात गाडगीळ यांच्या अमृत महोत्सवी बैठकीत ताईंनी गायिलेला शुद्धवट व दरबारी पण असाच लाजवाब होता. पुण्याच्या स.प. कॉलेजात सकाळच्या बैठकीत त्यांनी ऐकवलेला यमनी बिलावल संस्मरणीय असा ठरला होता.

जयपूर व पतियाळा घराण्याचा मनोज्ञ मिलाफ घडवून त्यांनी खास 'आमोणकर शैली' बनविली. वीणा सहस्त्रबुद्धे, अश्विनी, रघुनंदन पणशीकर, आरती, मीना जोशी यांचे गाणे ऐकताना किशोरी ताईंच्या त्यांच्या गायकीवर पडलेल्या प्रभावाची प्रचिती येते.

**व्यासंग**

ताईंचा संगीतशास्त्राचा व्यासंग जबरदस्त असा आहे. भरत नाट्यशास्त्रात सांगीतलेले संगीत व त्यातल्या श्रृती यावर त्यांचे मनन व चिंतन अविरत असे चालू असते. त्याचबरोबर विविध लोकसंगीताचा अभ्यास करून त्यातले आघात व स्वरस्थाने यांचा सूक्ष्म अभ्यास त्या सतत करीत असतात. आपल्या भजनात त्यांचा स्वरांस्वरांतून शुचिर्भूतपणा आढळतो. त्या जशा श्रेष्ठ गायिका आहेत, तशा उत्तम व कल्पक रचनाकारही आहेत. मीराबाईंच्या भजनांची त्यांनी अवीट गोडीच्या चाली लावल्या आहेत. याच खटाटोपातून 'मगन मीरा चली' हा संत मीराबाईंच्या गीतांचा कार्यक्रम त्यांनी तयार केलेला आहे. त्यांच्या श्रद्धाळू मनाला संत ज्ञानेश्वरांच्या अमर वाणीची गोडी लागली. त्यातूनच मग संत वाङमयाच्या

परिशीलनातून भाविक व सुरेल असा एक कार्यक्रम तयार केला. या स्वरमय ज्ञानेश्वर दर्शनाला त्यांनी 'तोंची नादु सुस्वर जाला' हे यथार्थ नाव दिले. या कार्यक्रमाची सुरूवात 'ज्ञानेश्वर माऊली तुकाराम' या सुस्वर नाम गजराने होते. भैरव रागाच्या या गजरानंतर एकापाठोपाठ एक अशी वीस भक्तिगीते त्या सादर करतात. अभंगाचा आशय लक्षात घेऊन त्यांनी प्रत्येक अभंगाला साजेल असा राग निवडला आहे. परंतु आशय अधिक गडद व्हावा म्हणून त्यांनी प्रत्येक रागाला शोभणारा पण त्या रागात नसणारा असा विवादी स्वराचा बिनदिक्कत वापर केला आहे. साथीला घेतले पखवाज, टाळ, तबला, पेटी, आणि मुरली. ज्ञानेश्वरांशी तन्मयता साधावी म्हणून संपूर्ण ज्ञानेश्वरी त्यांनी स्वहस्ताने लिहून काढलेली आहे. ''उत्तम छपाईची ज्ञानेश्वरी बाजारात विकत मिळत असताना, हा उपद्‌व्याप त्यांनी का केला?'' असे विचारणारे महाभाग निघतील. पण ज्यांना अध्यात्माच्या वाटेवर चालायचे आहे, त्यांना आपापले निराळे रस्ते चोखाळण्याचा मोकळेपणा भारतीय संस्कृतीने दिला आहे. ''मला अध्यात्माचा आधार मिळावा म्हणून मी नवीन काही करू शकले. अध्यात्म म्हणजे तरी काय? कुठल्याही एका विषयाचा एकाग्रतेने अभ्यास करणे, त्यातले सत्य सातत्याने शोधत राहणे, त्याचा मागोवा घेत राहणे, व अंतिम सत्य मान्य करणे, म्हणजेच अध्यात्म'' अशी त्यांची धारणा आहे. ''मनात एक भाव पण त्याचं रूप मात्र वेगळं ही विसंगती आहे असे मला वाटते. गायकीच्या संदर्भात मला जाणवलेला हा पहिला आघात होता. यातूनच मी स्वराचे भाव शोधित गेले. तो शोध अजूनही चालूच आहे. म्हणूनच माझ्या गाण्यात उत्कटता आणण्याचे प्रयत्न मी सातत्याने करीत असते. अनुभवाची खोली जितकी गाठावी तितका आपला तोकडेपणा जास्त जास्त लक्षात येतो. त्यामुळे मन झुरते. स्वतःच्या अनुभवातूनच वाट शोधत शोधत मी अधिक जुनी व अस्सल परंपरा पाहू लागले व अशा संस्काराचे रूप नकळत माझ्या गायकीतून प्रकट व्हायला लागले. मी मुद्दामहून 'आमोणकर शैली' बनवली नाही'' असे त्या विनम्रपणे सांगतात. म्हणूनच त्याचं गाणं ऐकताना त्यांची स्वतंत्र प्रज्ञा, स्वतंत्र वळण शोधण्याची त्यांची हिंमत, नेहमीच जाणवते. याच कारणाने श्रोते त्यांचे गाणे जीव टाकून ऐकतात.

“व्यवसायाच्या निमित्ताने सतत ठिकाणी हिंडावे लागते. हवा पाण्याचा बदल
न असतं. त्याचा प्रकृतीवर परिणाम हा होतोच. मैफलीचं म्हणून एक स्वतंत्र
तंत्र असतं. त्याशिवाय स्वतःची अपेक्षा पण असते. काय जमलं पाहिजे
ची एक विशिष्ट कल्पना मनात असते व त्या कल्पनेची आराधना करताना
ण येतो. त्यात कधी लय जमते तर कधी जमत नाही. खरा ध्यास असतो तो
गाचा भाव व लय शोधण्याचा. त्यात मन सतत गुंतवून ठेवण्याची इच्छा असते,
ण ते जमत नाही; तेव्हा त्याचा राग येतो व वैतागही येतो.” आपल्या मनाचा
डफडाट ताई अशा शब्दांत प्रकट करतात.

मनमिळावू सुविद्य पती, मार्गी लागलेले दोन्ही सुपुत्र व हजारो रसिकांची माया
व प्रेम, याना बरोबर घेऊन त्यांची पुढील वाट चालू आहे. “संसार व व्यवसाय मी
अन्य गृहिणीप्रमाणेच सांभाळीत असते.” असं त्या सांगतात तेव्हा त्यातला
गदर्शीपणा मनाला भिडतो. त्यांचा स्वरांचा प्रवास अखंडपणे चालू राहो अशीच
त्यांच्या हजारो रसिकजनांची एकमेव इच्छा आहे.



# मधुर मुरलीचा राजा–हरिप्रसाद चौरसिया

या पृथ्वीतलावर मुरलीचे मंजुळ स्वर आले कुठून? रानामध्ये झुळ्झुळ्
वाहणाऱ्या ओढ्याने माणसाला स्वर दिले का? का झाडाझाडातून उडणाऱ्या
पक्ष्यांच्या चिवचिवाटाने ती जाणीव निर्माण केली? सागराचा गंभीर गाज ऐकून
मानव अंतर्मुख तर झाला नसेल ना? या धरातलावर टपटप पडणाऱ्या पावसाच्या
सरींनी या नैसर्गिक संगीताला लय दिली असेल का? आणि असेच एक दिवशी
अवखळ वारा कळकाच्या (बांबूच्या) बनातून शीळ घालत राहिला अन् माणसाला
विचार पडला या वेळूमुळे तर हा सुंदर कर्णमधूर आवाज निर्माण झाला का? त्याने
एक बांबू घेतला व तो कुतूहलाने पाहू लागला. हा गोड स्वर आला कोठून? ते
शोधण्यासाठी तो मग बांबू पोखरायला लागला; टोकरू लागला. पोखरलेल्या त्या
बांबूत उत्सुकतेने पाहत असता त्याचा श्वास त्या पोकळ बांबूतून गेला असावा व
त्यातून गोड शिळेचा स्वर उमटला असावा. जगातील आद्य संगीत वाद्याची
निर्मिती अशीच झाली असावी.

पावा, मुरली, वेणु, अलगुज, बासुरी, फ्ल्यूट एक विलक्षण सुस्वर वाद्य! या
वाद्याला अजरामर केलं ते त्या वेणुगोपालाने. मुरलीच्या सुस्वरनादाने गाई
सांभाळणाऱ्या गोपाल, श्रीकृष्णाच्या त्या बासुरीच्या स्वरांमध्ये अशी काही मोहिनी
होती की, सारे ब्रजवासी आपले प्राण कानात साठवून त्या हरीची बासुरी तन्मयतेने

ऐकत असत. गाईगुरे, रानातील पशुपक्षी, वृक्षवल्लरी सुद्धा स्तब्ध होऊन त्या मुरलीधराच्या स्वरमाधुरीचा आनंद घेत असत. नरनारी बेभान होऊन रासनृत्य करीत असत.

**बालपण**

पंडित हरिप्रसाद चौरसिया हे मूळ अलाहाबादचे. त्यांचे वडील हे प्रख्यात मल्ल (कुस्तीगीर) होते. हरिप्रसादाच्या लहान वयातच ते वारले. हरिप्रसादांचा थोरला भाऊ लग्न झालेल्या काही दिवसांतच मरण पावला. त्यामुळे संपूर्ण कुटुंबाची जबाबदारी लहानग्या हरीच्या खांद्यावर येऊन पडली. अवघ्या सोळा वर्षांचा हरी एका खाजगी कंपनीत स्टेनो-टायपिस्ट म्हणून कामाला लागला. अठरा वर्षे पूर्ण होताच सरकारी नोकरीत दाखल झाला. पगार, महिना २५० रुपये. घराची जबाबदारी पार पाडत असतानाच पंडित भोलेनाथ मिश्राजींच्याकडे त्यांनी तालीम घ्यायला सुरुवात केली. मुलांच्या कार्यक्रमात भाग घेता घेता हरी रेडियोचा बासुरीचा नियमित कलाकार झाला. त्यांची बासुरीची ओढ जबरदस्त होती. त्या कारणाने त्याने आपल्या नोकरीचा राजीनामा दिला आणि तो भुवनेश्वरला एक गायक कलाकार म्हणून तिथे नोकरीला रूजू झाला.

वयाच्या बाराव्या वर्षापासून 'हरिया' (घरगुती नाव) बासरी वाजवायला लागला. वडील हरियाला आखाड्यात नेऊन कुस्तीचे डावपेच शिकवायला उत्सुक असत. पण हरियाला त्यात रस नव्हता. तो तासन्तास (वडिलांच्या भाषेत) 'नळकांडे' फुंकत बसायचा. वडील त्याला तो नाद सोड म्हणून घरी चोप देत असत, तर शाळेत मास्तर त्याला अभ्यासात लक्ष घालत नाही, म्हणून पिटाई करीत. पुढे वयाच्या एकोणिसाव्या वर्षी चौरसिया मुंबईला येऊन दाखल झाले अन् तिथले कायमचे रहिवासी बनले (१९६२). पुढे तर सारा इतिहास घडला. मुंबईला आल्यावर हळूहळू त्यांचे बस्तान बसू लागले. ते सिनेमाक्षेत्रात ओढले गेले.

**गुरूमाता**

अन्नपूर्णा शंकर (पंडित रविशंकर यांची प्रथम पत्नी) मुंबईला राहत असत. त्यांच्याकडून शास्त्रीय संगीताचे धडे घ्यावेत व त्यांचे शिष्यत्व पत्करावे म्हणून

चौरसियाने त्यांचे उंबरठे झिजवायला सुरुवात केली. सतत तीन वर्षे प्रयत्न केल्यावर मा अन्नपूर्णा प्रसन्न झाली व त्यांनी चौरसियाला रीतसर शिक्षण द्यायला सुरुवात केली.

अन्नपूर्णा या प्रख्यात शास्त्रीय संगीतकार अल्लाउद्दीन खानच्या कन्या. प्रख्यात सरोद वादक अली अकबर खानच्या भगिनी आणि प्रसिद्ध सतारवादक रविशंकर यांच्या प्रथम पत्नी. त्यामुळे संगीतक्षेत्रात त्यांचा दबदबा होता. चौरसियांनी तोपर्यंत शिस्तशीरपणाने तालीम घेतलेली नव्हती. अजूनपर्यंतची कमाई ही सर्वस्वी आपकमाई होती त्याला काहीच शिस्त नव्हती. अन्नपूर्णादेवींनी त्याला पूर्वीचे सर्व विसरायला लावले. पाटी कोरी करून घेतली आणि मगच संगीताचे धडे द्यायला सुरुवात केली.

मल्ल असलेल्या वडिलांना आपल्या मुलाने संगीत क्षेत्रात उतरावे हे पसंत नव्हते. 'संगीत' हे हलक्या लोकांनी साधना करायची कला आहे असे त्यांचे प्रामाणिक मत होते. आपल्या तीन मुलांपैकी धष्टपुष्ट असलेला मधला मुलगा हरिया याने मल्ल व्हावे म्हणून ते त्याला आखाड्यात ओढून नेत. हरिप्रसाद तिथे बळेबळे काही वेळ घालवून घरी निसटत व लपवून ठेवलेली बासुरी घेऊन बाहेर पडत. तासन्तास सराव करीत व रात्री घरी परत. हा नाद सोडवावा म्हणून वडील त्यांना वेळोवेळी बडवून काढीत असत. त्यामुळेच आपण प्रख्यात बासुरीवादक व्हावे अशी जिद्द त्यांच्यात निर्माण झाली होती. त्या जिद्दीपोटीच कडक शिस्तीच्या अन्नपूर्णादेवीकडे ते शिक्षण घ्यायला लागले.

चौरसियांच्या अगोदर स्वर्गीय पन्नालाल घोष यांनी लोकसंगीतात असलेली बासुरी शास्त्रीय संगीताच्या दरबारात स्थानापन्न करून ठेवली होती. चौरसिया यांनी काळजीपूर्वक पन्नालालांचे संगीत श्रवण केले, पण आपली स्वत:ची अशी खास शैली निर्माण केली. 'बासुरी' हे देवाचे (हरीचे) वाद्य आहे. श्रीकृष्णाने त्यात आपला प्राण ओतला होता. या वाद्यात कोणताही धातू, प्लॅस्टिक किंवा तारा नाहीत. आहे ते फक्त वाळका बांबू. या वाळक्या बांबूतूनच परमात्मा श्रीकृष्णाने ब्रजवासींनां वेड लावले होते. तोच आदर्श पुढे ठेवून हरिप्रसाद चौरसिया यांनी बासुरीवादन जगभर पोचविले.

संगीत दिग्दर्शक मदन मोहन, जयदेव, रोशन यांनी चौरसियांचे कलागुण हेरले व त्या सर्वांनी त्यांना वाव दिला. पुढे चौरसिया यांनी सिलसिला, २५ डाऊन इत्यादी अनेक चित्रपटांना संगीत दिले.

पंडित रविशंकर यांच्याशी घटस्फोट झाल्यावर अन्नपूर्णा यांनी 'सुर बहार' हा जाहीर कार्यक्रम करायला प्रारंभ केला. आपले बंधू अली अकबर खान यांच्याबरोबर काही काळ त्यांनी नाटकात पण काम केलं. आपला एकुलता एक मुलगा शुभो शंकर याला आपल्या आजोबाप्रमाणे संगीतकार होण्यासाठी संगीत शिक्षण द्यायला सुरुवात केली. पण वयात येताच आपल्या वडिलांबरोबर काम करण्यासाठी शुभो अमेरिकेला निघून गेला. तेव्हापासून त्या एकाकी पडल्या. त्याच काळात चौरसिया यांनी त्यांच्या जीवनात प्रवेश केला. अन्नपूर्णादेवींनी पण त्यांच्यावर पुत्रवत प्रेम केले व भरभरून संगीत शिक्षण दिले. म्हणूनच चौरसिया त्यांना 'गुरूमाता' या आदरणीय नावाने हाक मारतात.

अन्नपूर्णादेवीकडे तालीम घेणे सोपे काम नव्हते. सकाळी चार वाजल्यापासून रात्री उशीरापर्यंत शिक्षण चाले. संगीतातले सर्व बारकावे त्यांनी आपल्या शिष्याला शिकविले. अन्नपूर्णादेवींना बासुरी वाजवायला येत नसे. त्या रागदारीत गात व चौरसिया यांना तसे वाजवायला सांगत. पूर्वी चौरसिया उजव्या बाजूच्या ओठात धरून मुरली वाजवीत. त्यात बदल करून त्यांना ओठांच्या डाव्या कोपऱ्यातून वाजवायला लावले.

१९८६ साली पॅरिस येथील 'थियेटर ओडियन' येथे भारतीय शास्त्रीय संगीत समारोह आयोजित करण्यात आला होता. तिथे चौरसिया यांना दोन तास दिले गेले होते. पण ते वाजवायला लागले आणि सतत चार तासांच्यानंतरच त्यांनी मुरली बाजूला ठेवली. टाळ्यांच्या प्रदीर्घ कडाकडाटाने सारे थियेटर दणाणून गेले. जगप्रसिद्ध पाश्चात्य संगीताचे बासुरीवादक जीन पॅरे रामपाल प्रेक्षागारात चौरसियांचे वादन ऐकत होते. कार्यक्रम संपताच त्यांनी भारतीय पद्धतीने हरिप्रसाद चौरसिया यांना साष्टांग नमस्कार घातला. पश्चिम, पूर्वेला शरण आली. जगद्गुरू श्रीकृष्णाची मुरली जगत्वंद्य झाली. त्यानंतर सहा भोकांच्या आपल्या लाडक्या मुरलीचे स्वर चौरसिया यांनी अनेक कार्यक्रमांतून जगभर घुमविले. 'एटर्निटि'' व ''कॉल ऑफ

दि व्हॅली'' ह्या त्यांच्या तबकड्या जगभर गाजल्या. आतापर्यंत चौरसिया यांनी जगभरात ५०पेक्षाही जास्त देशांत आपले कार्यक्रम सादर केले आहेत. वर्षाला साधारण सहा कार्यक्रम ते परदेशांतून सादर करतात. परदेशात असताना ते दिवसांतून दोन कार्यक्रम करतात. अमेरिकेतील बाल्टिमोर शहराचे महापौर चौरसियांचे वादन ऐकून मोहरून गेले व त्यांनी तात्काळ चौरसिया यांना त्या शहराचे मानद नागरिकत्व बहाल करून 'सोन्याची चावी' (Golden Key) भेट दिली. (१९८७)

## वृंदावन

पंडित हरिप्रसाद चौरसिया यांनी अमाप कीर्ती व गडगंज पैसा कमावला. तरुण पिढीला गुरूकुल पद्धतीने संगीत शिक्षण देण्यासाठी त्यांनी 'वृंदावन' नावाची संस्था स्थापन केली आहे. तिथे ऑडिटोरियम आहे. संगीत ऐकण्यासाठी लहान लहान खोल्या आहेत. विद्यार्थ्यांना राहण्यासाठी वसतिगृह आहे. जगातील सर्व तऱ्हेचे संगीत तिथे एकत्रित करून त्याची लायब्ररी करावी असा मोठा प्रकल्प त्यांनी सध्या हाती घेतलेला आहे.

चौरसिया या वयातही अनेक तास रियाज करतात. आपले संगीत 'मिठ्ठास' असावे व त्यात 'भावना' असावी यासाठी ते नवनवे प्रयोग करीत असतात. श्वासाचे नियंत्रण व बोटांची हालचाल यात फरक करून पाहतात व त्यातूनच मग निर्माण होते ती विविध रागांची बहार!

महाराष्ट्राचे मुख्यमंत्री श्री. शरद पवार यांनी पंडित हरिप्रसाद चौरसिया यांना मुंबईत जुहूजवळ सहाशे मीटर जागा वृंदावन प्रकल्पासाठी दिली. तिथेच आता त्यांचे विद्यादान सुरू आहे. विद्यार्थ्यांना तिथे फी आकारली जात नाही. विद्यार्थ्यांनी आपले संपूर्ण आयुष्य व वेळ संगीतात व्यतीत करावा अशी त्यांची इच्छा आहे.

पंडित हरिप्रसाद चौरसिया यांच्या रूपाने हरीची मुरली जग पादाक्रांत करून गेली आहे; हे भारतीयांना अभिमानास्पद वाटावे अशी गोष्ट आहे.




































# मुक्तांगण प्रकाशन

८८०, शुक्रवार पेठ, पंचमुखी मारुती मंदीरासमोर, पुणे ४११००२.

फोन : ९३७०१६८८९९, ९८६०२८६१२६